# मीनाक्षी.

हें तीन अंकी नाटक
( होमरसाहेबांच्या इलियड पुस्तकाच्या
पहिल्या भागाचे आधारानें )

रा. रा. नारायण बल्लाल नामजोशी
पेनशनर अ० मा० ऑ० व० स्कूल वऱ्हाडपैकीं
यांनीं रचिलें
तें

रावजी श्रीधर गोंधळेकर
यांनीं
आपले " जगद्धितेच्छु " छापखान्यांत छापिलें.




पुणें
सन १८९३.



किंमत ०।१२ आणे.

# प्रस्तावना.

व्यक्तिमात्राचें व तदंगभूत देशाचें व राष्ट्राचें ज्ञानभांडार वाढविण्याचें मुख्य साधन काव्य, म्हणजे कादंबरी, नाटकें, व वर्तमानपत्रें हें होय; असें पुष्कळ लोकांच्या मनांत भरलें, आणि त्यांनीं, कादंबऱ्या, व नाटकें, कल्पित व भाषांतररूपानें छापून प्रसिद्ध करण्याची चांगलीच सुरुवात केली. पण तशीं पुस्तकें विद्वानांच्या पुढें आलीं तेव्हां तीं निपजावयास पाहिजेत तशीं नसल्याकारणानें कादंबरी, ( नावल ) व नाटक याविषयावर रा॰ रा॰ काशीनाथ बाळकृष्ण मराठे बीए एल् एल् बी. यानीं निबंध लिहून दक्षिणाप्राईज कमिटीकडे पाठविला तो त्या कमिटीनें पसंत ठरवून निबंधकारास बक्षीस दिलें. हा निबंध छापून प्रसिद्ध झाला, तरी त्याचा जितका फैलाव व्हावा तितका झाला नाहीं व नाटकें लिहिणाऱ्या ग्रंथकारांनीं त्याकडे लक्ष पुरविणें अवश्य होतें तितकें पुरविलें नाहीं. असें त्या निबंधकालाच्या अलिकडे जीं नाटकें प्रसिद्ध झालीं त्यांचे अवलोकनानें कळतें.

सदरीं काव्याचे प्रकार सांगितले त्यांत 'काव्येषु नाटकं काव्यं' अशी आर्योक्ति आहे. ह्यावरून हितानहिताचा लोकांच्या मनावर परिणाम होऊन त्यांनीं आपलें व देशाचें बरें वाईट करून घेण्याच्या संबंधानें जो मार्ग स्वीकारावासें वाटेल तो

स्वीकारण्यास लागण्याला नाटकी ग्रंथ बरेच अंशीं कारणीभूत होतात, असें श्रेष्ठजनाच्या प्रत्ययास आल्यावरून नाटकरूपी काव्यास त्यांनीं श्रेष्ठत्व दिलें. पण छिचोर नाटकी पुस्तकांचे फैलानें इष्ट हेतु सुटून दुर्मार्गाकडे पुष्कळ होतकरू लोकांचीं मनें वळूं लागलीं, असें होतकरूंच्या पालकांचे खिशास, व मनास, किरी लागल्यानें दिसूं लागलें.

प्रसिद्ध झालेल्या नाटकी ग्रंथांची भाषा बिकट, दुर्बोध वगैरे प्रकारची असल्यामुळें असा वाईट परिणाम होऊं लागला, हें सांप्रत कैलासवासी रा० रा० अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे मनांत येऊन पूर्वींच्या नाटकांचें स्वरूप बदलून त्यानीं त्यास संगीत बनविलें, आणि लोकांनीं ज्या गोष्टींकडे विशेष लक्ष देणें अवश्य आहे अशा एकदोन मुख्य गोष्टींचा शिरकाव त्यांनीं आपल्या संगीत शाकुंतल ग्रंथांत केला आणि पूर्वींचे नाटकी भाषेस व कृतीस मागें पाडिलें.

कै० वा० रा० रा० किर्लोस्करांची भाषा फार सुरस, फार प्रौढ, त्या ग्रंथांतील, " परवशता तिखट सुरी " ह्या वाक्याकडे सुजाण विद्यार्थ्यांचें लक्ष पोंचून त्या सुरीचा स्पर्श आपणास न होऊं देण्याच्या प्रयत्नास बरेच लोक लागले आहेत हें पाहून खरे देशहितेच्छूस संतोष वाटत आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट घडत आहे.

ह्याच्याच उलट—किर्लोस्करांचे हेतूची समजूत घेण्याकडे कानाडोळा करून भोंदू नाटककारांनीं आपल्या नाटकांस संगी-

त बनवून कसें, भोळ्या भाविक लोकांचा बहुतेक अंशीं घात व तोटा करण्याचें साधन करून, केवढा अनर्थ मांडला आहे पहा!

अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचे मंडळांत " सुंदर मुख तुंदिल तनु " "झडझडुनी कडकडुनी" "मित्रा मरण बरें वाटतें" इत्यादि कवितांचे घोष खणखणीतपणें जिकडे तिकडे कानीं पडतात. गेल्या सहा माहीच्या परीक्षेंत जे एखाद्या विषयांत नापास, ते ह्या सहा माहींत तीन विषयांत नापास असें शिक्षक लोक त्या मुलांच्या पालकास कळवीत आहेत, मुलांनीं अभ्यास कां सोडला ह्याची पूसतपास आईबाप करतात तें त्या मुलांस आवडत नसल्यामुळें तीं घरदार आईबाप सोडून देशांतरास जाऊं लागलीं आहेत!!! हीं, नाटकें, गारोड्यानें उत्पन्न केलेलें आंब्याचें झाड डोळ्यांस जसें चकवतें, तशीं कोंवळ्या मनास भुरळ घालणारीं आहेत.

ह्या भोंदूनाटकी ग्रंथांपासून होतकरू पिढीचीं मनें आपोआप मनरंजन साधनाच्या द्वारें सहज अभ्यासाकडे वळावीं, एवढेंच मनांत आणून कीं काय न जाणो; प्रोफेसर केळकरांनीं शेक्सपिअरच्या पुस्तकांतील एका वेंच्याचें भाषांतर केलें आहे तें उत्तम साधलें आहे हें निर्विवाद आहे. पण जे विद्यार्थी प्रवेश परीक्षा देण्याचे योग्यतेजवळ जवळच्या पायरीपावेतों पोंचले आहेत त्यांच्या मात्र तें उपयोगी व तेंही एकदेशी. त्या पुस्तकांत महत्त्वाचे गर्भित उद्देश तितपतच आहेत असें म्हणतात. वाळूचे बंधाऱ्यावर टोलेजंग घर बांधल्याप्रमाणें तें झालें आहे.

आरंभींच विद्यार्थ्यांचीं मनें वळवण्याचे उपयोगीं तें नाहीं असें म्हणतात.

संगीत नाटकी ग्रंथकारांनीं आपला दुष्ट हेतु सोडावा म्हणून सामान्य लोकांनीं त्यांस लाजविण्याचे हेतूनें संगीत हें विशेषण ज्या शब्दास जोडल्यानें लोकांनीं हंसावें *अशा नामवाचकास तें विशेषण लावून तर्शी पुस्तकें पुष्कळांनीं प्रसिद्ध केलीं तरीही कांहींच त्या संगीत नाटकाचे पाऊल मागें वळल्याचें निदर्शनास आलें नाहीं.

त्या आंब्याच्या झाडाप्रमाणें क्षणैक संतोष वाटविणाऱ्या नाटकांचेबद्दल अभ्यास करणाऱ्या अल्पवयी मुलांस समजण्यासारख्या सोप्या व त्यास अभ्यासास मदत होण्याजोगे विषयास किर्लोस्कराच्या नाटकांत कांहीं गर्भित उद्देश सहज उत्पन्न असल्यापैकीं एकच उघाडीस आला. तसले पुष्कळ हेतू अज्ञ जनाच्या मनांत, कोणी एखादा गृहस्थ, उत्पन्न होण्याकरितां,ते घालून होण्यासारखें नाटकरूपी पुस्तक कां प्रसिद्ध करीत नाहीं अजून ! कोण जाणे.

असे सभ्य व वजनदार लोकांचे उद्गार कानीं पडल्यावरून ह्या देशहितेच्छु लोकांची इच्छा अंशतः पुरविण्याचे हेतूनें मराठे यांचे निबंधास अनुलक्षून हें पुस्तक मीं तयार केलें. आणि हें कितपत बनलें आहे ह्याची शहानिशा हें छापविण्याचें पूर्वीं; नावल व नाटक ह्या विषयांवर निबंध लिहिणारे गृहस्थाकडे

* बहिरदिशा, हजामत.

पाठवून परीक्षण करून आणावें, हें बरें ठरल्यावरून तसें केलें आहे. म्हणून हें कितपत वठलें आहे हें वाचकांस कळावयाकरितां रा० रा० मराठे मजकुराचा व न्यू इ० स्कुलांतील संस्कृत-शाखेकडील गुरु ह्या उभयतांचे शेरे ह्या पुस्तकाचे आरंभींच जोडले आहेत; त्यांवरून माझ्या परिश्रमाची योग्यता सकृत् दर्शनींच कळेल.

ख्याल, ठुंबरी, गजल वगैरे प्रकारचे पद्यकाव्यांहून, साक्या, श्लोक, आर्या, हीं पद्यें, शिष्ट व संभावित लोकांस, तीं गायन-कलेच्या ज्ञात्यानें रागदारीनें गाइलीं, तर पहिल्यानें दर्शविलेल्या पद्यापेक्षां विशेष आवडतात म्हणोन तशीं पद्यें बरींच घातलीं आहेत. म्हणून हें नाटक संगीत नाहीं असें वाचकांचे मनांत येणार नाहीं अशी ग्रंथकर्त्याची समज आहे.

# उपोद्घात.



पर भाषेंतील ग्रंथाचें केवळ भाषांतर केलें असतां, देश, धर्म रीतरिवाज हे निरनिराळे असल्यामुळें, तें मुळींच गोड लागत नाहीं. मूळ ग्रंथाचा तात्पर्यार्थ घेऊन तो देशभाषेंत लोकप्रिय होण्याकरितां रचलेल्या नव्या ग्रंथांत त्या तात्पर्यार्थास, आदि, मध्य व अवसान इत्यादि स्थळीं अवश्यकतेप्रमाणें वांटून घालावें लागतें. पण वाचकांनीं ग्रंथ वाचला म्हणजे तो आपोआप सर्व त्याचे मनास कळून येतो. आणि ज्यांनीं मूळ ग्रंथ वाचला असेल त्यांस हें अमुक ग्रंथाचें भाषांतर आहे असें सहज कळतें. आणि ग्रंथकर्त्याचें अंगीं आपलें हृद्गत दुसऱ्याचे मनांत भरविण्याचें जितपत सामर्थ्य असेल त्या मानानें वाचकांचे मनावर ठसा उमटतो. हें पुस्तक होमरच्या ईलियडच्या पहिल्या बुकाच्या आधारानें रचलें. त्यांतील मुख्य दोन पात्रें अकेलीज, व अट्रायडीज, ह्या उभयतांचे गुणधर्म, भारतांतील मुख्य दोन पुरुष, दुर्योधन व कर्ण ह्यांच्या गुण धर्माशीं बहुतेक अंशीं साम्य पावतातसें वाटलें म्हणून, व विधर्मी नांवें मराठी भाषेंत सामान्य जनसमुहास रुचत नाहींत म्हणून सर्व पात्रांस भारतांतलींच नांवें योजिलीं आहेत. हें मीं रचलेलें नाटक वाचण्याचें व ऐकण्याचें कामीं आपला अमूल्य वेळ खर्चीं घातल्याबद्दलच रावबहादुर मराठे

फ० क्ला० स० जज्ज व गुरुवर्य. नंदुर्गीकर शास्त्रीबोवा या उभयतांचे ग्रंथकर्त्यावर मोठे उपकार आहेत.

हें पुस्तक उत्तान व्यापारदृष्टीनें फारसें उपयोगाचें दिसत नसल्यामुळें छापविणारास फायदा होण्यास पाहिजे तितका होण्याचा संभव नाहीं. पण मर्मज्ञ व्यापारी तात्पर्य पहाणारा, नफ्यासुद्धां सव्याज पैसे देऊन घेऊन जाण्याजोगें आहे.छापविणारा मात्र दमदार असावा. असें म्हणून हे छापण्यास सर्वतोपरी रा० रावसाहेब गोंधळेकर यांनीं आश्रय दिला हें ग्रंथकर्त्यावर फारच मोठे उपकार झाले हें ग्रंथकर्ता कधीं विसरणार नाहीं.



# REMARKS.

ıave looked into several parts of this ˙tion. It is an adaptation to the native the subject of the first canto of the Iliad. .rathi language that is used is plain and and unencumbered with heavy Sans- ables which the modern writers of news- novels, and dramas, are fond of. The book e whole readable and interesting.

ıy 1893.

d. KASHINATH BALKRISHNA MARATHA, B. A.
1st Class Sub-Judge.

N. B. Namjoshi was kind enough to read ıis dramatic composition styled मिनाक्षी, in vacation of May. It is an adaptation ;ed to the native taste of the subject f the first canto of Homer's Iliad. The rs of कर्ण, मीनाक्षी, योगी and चंद्रप्रभा in my ɔpinion are charming in themselves and :ectly developed. The book is on the valuable boon to the literature of Marathi It deserves a marked patronage from re and patriotic lovers and workers in of marathi literature.

e 1893.

Sd. GOPAL R. NANDARGHIKAR,
Sanskrit Tutor.
New English School, Poona.

# या नाटकांतील पात्रें.

सूत्रधार.... .... .... .... .... ....व्यवस्थापक.
विदूषक.... .... .... .... .....हास्यरस उत्पादक.
नटी.... .... .... .... .... ....सूत्रधाराची स्त्री.
दुर्योधन.... .... .... .... .... .... ....नायक.
कर्ण.......दुर्योधनाचा मित्र, मंत्री, एक मांडलिक अंगद राजा.
शकुनी.... .... .... ....दुर्योधनाचा मामा व आमात्य.
कंचुकी.... .... .... .... ....अंतःपुरांतील भालदार.
जोशी. .... .... .... .... ....राजाश्रित भिक्षुक.
विहंगिका. }
तरलिका. } .... नाईकेच्या दासी ( बरोबर आलेल्या. )
योगी.... .... .... .... ....एक फिरस्ता गोसावी.
सुंदरक. .... .... .... .... ....राजाचा हुजऱ्या.
निपुणिका. }
प्रियंवदा. } ....राजवाड्यांतून नाइकेचे तैनातीच्या दासी.
मीनाक्षी. .... .... ....मुख्य नाइका दुर्योधनाची स्त्री.
ब्राह्मण. .... .... .... ....वेषधारी, मीनाक्षीचा बाप.
जमादार. .... .... .... .... .... ....द्वारपाल.
जामदार... .... .... .... ....दरबारचा कोठीवळा.
अश्वत्थामा.... .... .... ....फौजेंतील एक हुद्देदार.
विश्वंभर.... .... .... ....मीनाक्षीचा बाप जन्मदाता.

सुशर्मा. .... .... .... .... .... ....सेनापती.
गर्गपुरोहित.... .... .... .... .... ....राजगुरू.
भगवती. .... .... .... ....देवता ( आकाशवाणी. )
भीष्म....राजाचा मुख्य सेनापती, राजघराण्यांतील वडील पुरुष.
चेटी. .... .... .... .... ....राजवाड्यांतील दासी.
बुधाजी. .... .... .... .... .... ....हुजऱ्या.
जयधर. .... .... .... .... ....अंगराजाचा दूत.
जलदेवता.... .... .... .... ....अंगराजाची आई.
जयद्रथ....दुर्योधनाच्या फौजेंतील एक अधिकारी (मांडलिक.)
पांचालक.... .... .... .... ....जयद्रथाचा सेवक.
जनार्दन. }
रामशास्त्री. } .... .... .... ....विश्वंभराचे विद्यार्थी.
अन्नपूर्णा. .... .... .... .... ....विश्वंभराची स्त्री.
यमुना. .... .... .... ....विश्वंभराची दुसरी मुलगी.
राधा. }
भागीरथी. } .... ....मीनाक्षीच्या बाळपणाच्या मैत्रिणी.
सरस्वती. }
धर्माधिकारी.... .... ....हरीपूर गणेशपूरवासी गृहस्थ.
शिवनंदन. .... .... .... ....जयद्रथाचा कारभारी.
गर्गमुनेश्वर. .... .... ....वारुणावतींत रहाणारा पंडित.

# मीनाक्षी.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

### मंगलाचरण.

आर्या.

आधीं वंदूं त्याच्या पादा आधींच सर्व हरित्याच्या ॥
पुत्रा नगतनयेच्या तैसे भावें सदां हरिहरांच्या ॥ १ ॥

श्लोक.

मी दीनगे बुडतसें भवदैन्य डोहीं ॥
वर्णावया गुण तुझे मज बुद्धि नाहीं ॥
दे शारदे मज अतां बहु गोड वाणी ॥
जी वेधि सन्मन विपत्ति मुळीस खाणी ॥ २ ॥

अक्षक्रीडनिं हारतांच सदना सोडून रागें वना ॥
गेला जो न मिळे गणांस मुनिंच्या धुंडाळितांही मना ॥

टाकोनी अभिमान शुद्ध बनली भिल्ली उमा तैं तिला ॥
पावे शंकर तो समस्त अमुचा नेऊ लया आधिला ॥ ३ ॥
लक्षून सत्या जनिं वागतांना ॥
कष्टूनही अन्न पुरें मिळेना ॥
सोसे न आतां भव दैन्य गोणी ॥
हातीं धराहो मज चक्रपाणी ॥ ४ ॥
दरिद्राही मोठा प्रबल गिळूं पाहे भगवती ॥
तयातें फाडाया प्रखर नखरा तूं खगपती ॥
सुविद्ये तूं मातें क्षण धरुनि हातें रिपुशिरीं ॥
जगीं नाचायाला सबळ करिं पावें झडकरी ॥ ५ ॥

( पडद्यांत ) पुरे, पुरे, कालातिक्रम होत चालला, आतां मंगलाचरण पुरे असा शब्द होतांच विदूषक सभास्थानीं प्रवेश करून कांहीं अंगविक्षेप करीत करीत अद्वातद्वा बोलूं लागतो.

**सूत्रधार**—( विदूषकास लक्षून ) मित्रा कार्यारंभीं, तें निर्विघ्न तडीस जावें म्हणून श्री गणपतीची प्रार्थना करावयाची पण मी तुझी करितों हिजकडे लक्ष दे.

**श्लोक.**

गेल्या छत्तिस वत्सरांमधि गळ्या झालीं भलीं नाटकें ॥
आतां तोषवि रीति ती न रसिका वाचाळता पाठकें ॥
माढर्ये करितां सुजाण म्हणती, जातो वृथा काळ हा ॥
दावा मार्मिकता बहू विधरसीं व्याख्यानिं काव्यीं महा॥६॥

**विदूषक**—अहो छटाकींत क कंमती प पडूं नये म्ह म्हणून

हा भाग उचलला ध्या त्यालाही तु तु तुह्मी न्ह नको म्हणतां! थो थो तोंड बांधून बु बुक्यांचा मार न्ही का काय!!

**सूत्रधार**—कां? अहो राव, अद्यापही तुमची उतरली नाहींच का पुरती?

**वि०**—नई तस न्हाइ कांई, पण आज हास्यरसाची रेलचेल करावी असें मनांत फार होतें. पण करावें काय! वारा वाहील तशी पाठ देणें भाग आहे. अस्तु, राहिली आमची काडवात, तुमचेंच कां होईना! कसेंही करा. धोंड्यावर धोंडा घाला कीं कांट्यानें खुंटा काढा अन् तूपरोटी वाढा म्हणजे झालें! बरें आतां आपलें म्हणणें काय आहे.

**सू०**—बाबा रागावूं नको. आपल्या सर्व संवगड्यांसह तयार होऊन ये लवकर म्हणजे झालें.

**वि०**—( नटीकडे पाहून ) आम्ही सर्व तयार आहों.

**सू०**—वा, फारच नामी! आतां मी ह्या सभासदांची थोडी प्रार्थना करितों आणि आरंभ करा.

## आर्या.

बुध हो तुमचा सेवक वदतों ऐका समस्त अवधानें ॥
सुरस कणातें सेऊन त्यागावा निरस जेंवि झाऱ्यानें* ॥ ७ ॥

सज्जनहो, धृतराष्ट्राचे आज्ञेप्रमाणें पांडव वारुणावतीस जाऊन राहिल्यावर तेथेंही त्यांस चैन पडूं देऊं नये, ह्या हेतूनें त्यांजवर

* झारेकऱ्यानें.

स्वारी करण्याकरितां दुर्योधन गेला; त्या स्वारींतल्या प्रकाराचें एका कवीनें नाटकरूपानें वर्णन केलें आहे. त्याचा खेळ आपणापुढें करून दाखविण्याचें योजिलें आहे. तर ही नाटकाची अपूर्व टूम असल्यामुळें, योजकाचे श्रमसार्थक्यास्तव इकडे सर्वांचें अवधान असावें. ( नटीकडे वळून ) हूं चालूं द्या.

**नटी**—कोणत्या प्रकारच्या म्हणजे कोणत्या काळावरच्या गाण्यास आरंभ करूं ?

**सू०**—नाटककारांनीं कालानुरोधानेंच आरंभ केला पाहिजे, हें कसें बरें तुला धोरण नाहीं ! प्रस्तूत वसंतकाळच आहेना ? मग अशी भांबावतेस कां ? पहा ह्या ऋतूंत लोक कृष्णागरुच्या उट्या घेतात, मोतियाचे हार, गजरे घालून, निबिड अंबराईचे छायेस विलासमंदिरांत बसून मलयागिरी चंदनी पंख्यांनीं वारा घेतात. वस्त्रांवर गुलाबपाण्याचें सिंचन करून त्याच्या, व दवणा, पाच, मरवा इत्यादि सुगंधिक द्रव्यांच्या, मधुरवासानें मन रिझवितात, अशा प्रियकर ऋतुव्यतिरिक्त कोणत्यास गाणार ! बरें आणखी ह्यांत काय मौज आहे पहा.

**साक्या.**

वसंत येतां कामिजनांना होतो हर्षचि मोठा ॥
वाटे त्यांना हाच असावा याहुन कोणी न मोठा ॥८॥
घेउन युवती जाउन रानीं प्रेमे नर बहु रमती ॥
आम्रतरूंच्या शीतछायें रवि कर जींत न शिरती ॥९॥

( पडद्यांत ) नाटकाचार्या, गोंगाट बंद कर. उष्मामुळें कौ-

रवेश्वरास अंतःपुरांत चैन पडत नसल्यामुळें स्वारी इकडे येण्यास निघाली.

**सू०**—( ऐकलेसें करून ) काय कुरुपतीची स्वारी इकडे येते आहे. वाहवा ! फार चांगली गोष्ट झाली. ह्या उष्णकाळच्या कृपेनें कुरुनाथाची स्वारी इकडे येत आहे, ही आमच्या दारिद्र्यमित्राचा उच्छेद करण्याकरितांच येत आहे ह्यांत संशय नाहीं. खरोखर हा उष्णकाळाचा आह्मावर अनुग्रहच आहे.

( पडद्यांत ) कौरवेश्वराचा विजय असो, असा शब्द करीत करीत भालदार सभेंत प्रवेश करतो. राजाही सभास्थानीं प्राप्त होऊन सिंहासनारूढ होतांच—

**दुर्योधन**—(उसासा टाकून) हाँ, आतां कांहींसें बरें वाटतें.

**सूत्रधार**—( नटीकडे पाहून ) हं.

**नटी**—

## साक्या.

वसंतऋतुमाधिं मध्यरात्रिला वारा झुळझुळ येतो ॥
तप्ततनूंला शांतवुनी तो मनिचा ताप हरीतो ॥ १० ॥
अरुणोदयिं ते उठूनि सज्जन प्रेमें प्रभुला ध्याती ॥
उरकुनि स्नानें अर्धबिंबिं ते अर्घ्यें रविला देती ॥ ११ ॥
जपतपकर्में सारुनि कोणी सहज फिराया जाती ॥
शकटीं वारूंवरी बैसुनी मृगया करुनी येती ॥ १२ ॥
सुवर्ण ताटीं ठेउन वाटी सेविति बहुविधमेवे ॥
पाटीं बैसुनि तृषा वारण्या लेहा सेविति भावें ॥ १३ ॥

( पडद्यांत )—अंगराजाचा विजय असो. असा शब्द ऐकतांच,

**दुर्योधन**—वहावा! वहावा! काय आनंदाची गोष्ट घडून आली.

**सूत्रधार**— आर्या.

वारण सीतावारण करि कीर्णानें हरी खरा मित्र ॥
तैसा उद्विग्नाच्या हृदया सुखवी सदां खरा मित्र ॥ १४ ॥

**कर्ण**—(सभास्थानीं प्रवेश करून) कौरवेश्वरा वंदन करतों.

**दुर्योधन**—यावें अंगराजा. ( शिष्टाचाराप्रमाणें परस्पर भेटतात आणि आसनारूढ होतांच ) अंगराजा!

आर्या.

स्वात्योदकदानानें तोषविती चातकांस जलद जसे ॥
त्वद्दर्शन त्वत्प्रेमा मन्मनिंचा सर्वताप हारितसे ॥ १५ ॥

आतां माझ्या असुखाचा जो कांहीं अवशेष राहिला आहे हा, आपण इतक्या रात्रीस अकस्मिक आणि विशेषेंकरून ह्या स्थळीं प्राप्त होण्यास कारण काय झालें, हें आपल्या मुखानें ऐकल्यावर, दूर होणार आहे.

**कर्ण**—काय चमत्कार सांगावा राजा! प्रहर रात्रीचे सुमारास अंतःपुरांत फार उष्मा होऊं लागला; तेव्हां मोतीबागेंतील लतामंडपांत जाऊन बसतों न बसतों तोंच वाऱ्याची झुळुक आली त्या योगानें बरें वाटलें. डोळा लागतो न लागतो तों आपलें पाचारण आल्याचा भास झाला. आणि जसा

कांहीं मी आपल्या समीपच बसल्यावर मनास आल्हाद होऊन,

श्लोक.

मीनाक्षी अधरामृतीं बिलगला भृंगाचसा मित्रतो ॥
सोडीना जलजा समान मुखतें येतां नभीं मित्रतो ॥
भेटेना कवणा जनांहि न पुसे राज्यस्थितीही कशी ॥
वाटे आज कथी विलास घडले जे सर्व गेल्या निशीं ॥ १६ ॥

**दुर्योधन**—तसें झालें असलें तरी त्यास कारण आपणच. पहा—

आर्या.

माझ्या सिंधुसुखाचा, राज्याचा धीर, तूं, वृषा साच ॥
ऐसा मित्र जयाचा करि चिंता तो जनांत वृष साच ॥ १७॥

**कर्ण**—प्रकृत विषयाव्यतिरिक्त गोष्ट काढून चाललेल्या गोष्टीकडे कानाडोळा करण्याची थोर पुरुषांची चालच आहे. पण त्या आपल्या स्थितीस मीच कारण असें आपण म्हटलें तें कसें?

दु०—वाः तें तर अगदीं व्यक्त. पहा, मीनाक्षी ही अत्युत्तम वस्तु असतां तिजवर आपण आसक्त न होतां प्रेमानें, आपण ती मजला नजर केलीत. तेव्हां ज्यानें, जी वस्तू प्रेमानें, ज्यास अर्पण केली, त्यानें त्या वस्तूचा योग्य कालीं व योग्य रीतीनें उपभोग न घेतला, तर ती वस्तू ज्यानें दिली, त्यास, घडलेला प्रकार ऐकून किंवा पाहून, वाईट वाटतें, तसें आपणास वाटूं नये, म्हणून मित्रधर्मन्यायास अनुलक्षून आपणास खेद

न वाटावा एवढ्यासाठींच केवळ नव्हे; तर आपणास विशेष आनंद व्हावा; आणि ज्या योगानें आपल्यास आनंद वाटेल, तेंच माझें मुख्य कर्तव्य हें मनांत आणून आपण मला अर्पिलेल्या वस्तूचा मीं अंतःकरण पूर्वक उपभोग घेतला. दुसरें काय केलें!

**कर्ण**—समयसूचकतेचा गुण आपले आंगीं लोकोत्तर असल्यामुळें या प्रसंगीं मित्रधर्मन्याय कुशी आपण लढविलीत हें आपणास भूषण होय. पण अन्योक्तीनें सांगण्यापेक्षां त्या वस्तूचे आंगींच अद्वितीय मोहकत्व असल्यामुळें मी अगदीं आसक्त झालों होतों, असें म्हटलें असतें तर व्यवहारदृष्ट्या विलग दिसलें नसतें.

**दु०**—हंः हंः हंः हंः हंः ! ! ! ( हर्ष भरित होऊन टाळी देण्यास हात उचलतो )

**कर्ण**—( आनंद प्रदर्शित करून टाळी घेतो ) आपली मर्मज्ञता पाहून संतोष वाटतो. अस्तु. पुढें काय झालें अंगराजा ?

**कर्ण**—आपण ह्या स्थळीं प्राप्त झालां आहांत, आणि माझें स्मरण केलेंत. असें एका मनुष्यानें ( नाटकाचार्याचे सेवकानेंच असावें ) माझ्या द्वारपालकास हांक मारून कळविलें. ती हांक ऐकून जागा झालों, आणि तपास करवून पाहिलें तों खरेंच पाचारण आलें आहे. असें कळतांच हा आपल्या भेटीस आलों.

**दु०**—( प्रसन्न मुद्रेनें सूत्रधाराकडे पाहून ) शाबास नाटकाचार्या.

**कर्ण**—बुद्धिमंत सुशील, हिम्मती, सद्वर्तनी, सदाचारी, गरीब, कुशल, समयज्ञ, आणि एकनिष्ठ अशा लोकांकडे, आपण कृपादृष्टी केल्यानेंच त्या लोकांचें कल्याण आहे एवढेंच नव्हे. त्यांचें कल्याण झालेंसे पाहून होतकरू पिढीच्या तरुण लोकांसही आपली हुशारी सरकारचे नजरेस आणण्या जोगे नवीन धंदे काढण्यास हुरूप येईल. आणि सांप्रत निरुद्योगी असलेल्या लोकांस कोणता तरी धंदा नवीन काढण्याचा नाद लागेल. प्रजा निरुद्योगी नसणें हें राजास मोठ्या भूषणांपैकींचेंच एक आहे. ( ही पुढील कथानकाची सूचना होय. )

**कंचुकी**—महाराजाचा विजय असो. बुधक द्वाराजवळ येऊन उभा आहे.

**कर्ण**—कंचुके ही थैली बुधकाजवळ नेऊन दे. आणि जयद्रथ राजाकडे घेऊन जावयास सांग. ( राजाचे कानीं लागून निघून जातो व राजा आपल्या शिबिरास जातो.

---

## प्रवेश २ रा.

—०—

### स्थळ—इंद्रप्रस्थ कचेरीचा डेरा.

**दु०**—कां, मामा, वारुणावर्तींत शत्रू जिवंत असतां उघडपणें त्यांवर स्वारी करण्याचा प्रसंग आलाचना शेवटीं.

**शकुनी**—राजा, बी रुजत घातली, आणि वरचेवर तिला पाणी पोंचवीत गेलें, व पाहिजे तसले मसाले घातले व माळ्यानें आपलें सर्व चातुर्य एकदम खर्च केलें तरी तीपासून झाड निर्माण होण्यास थोडी तरी अवधी लागेलच. पण बी रुजणारच नाहीं, असें मात्र व्हावयाचें नाहीं हें खास ! पुरोचनासारखा कारस्थानी व चतुर, संधि कधींही फुकट जाऊं देणार नाहीं; हें आपण खास समजा.

**कंचुकी**—सरकारचा विजय असो. वारुणावतीहून आलेला जासूद देवडीवर हजर आहे. ( थैली पुढें ठेवितो )

**शकुनी**—( थैली हातांत घेऊन न्याहाळून पाहून ) अक्षर-ओळखीचें नाहीं ! असें कसें ! कोणाचें पत्र आहे व कशा प्रकरणीं आहे कोण जाणे ! पुरोचनाचें मात्र नव्हे हें खास !!!

**दुर्योधन**—कोणाचे हातचें कां असेना ? लखोटा फोडून वाचून पहा लवकर.

**शकुनी**—( थैली फोडून आंत असलेलें पत्र वाचतांच ) हें पहा आमचे प्रयत्नाचें फळ !

**दुर्योधन**—काय ! माझे शत्रूंचा नाश झाला ? नीट वाचा.

**शकुनी**—पाहिलें, नीट वाचून पाहिलें. आपल्या शत्रूंचा नाश झाला इतकेंच कां म्हणतां, शत्रू समूळ नाहींतसे झाले बरें. पण एक मात्र अनिष्ट गोष्ट झाली.

**दु०**—ती काय ! तो लठ्ठभारती वृकोदर पळाला असेल; नाहींतर त्यानें भलतेंच कांहीं तरी अघटित कर्म केलें असेल.

माझ्या डोळ्यांत तोच काय तो फार खुपतो आहे. कसें काय आहे तरी काय, कळू द्या पाहूं.

श०—कळायासारखें विशेषसें नाहीं. शत्रू तर जळून भस्म झालेच. पण, त्यांसरसा पुरोचनही कुटुंबासह जळून मेला एवढें काय तें अनिष्ट. तसेंच हें वर्तमान पुरोचनाचे नजरबागेवरील माळ्यानें लिहिलें, नागरिकांपैकीं एकानेंही लिहिलें नाहीं असे मगरूर ! ! !

दु०—अं: आतां ते किती का मगरूर असेनात; त्यांची खबर घेण्यास आपण जातच आहों. अहाहा ! हें आनंदाचें वर्तमान ऐकण्यास ह्या समयास अंगराजा जवळ नाहीं ! अंगराजास जासूद पाठवा लौकर.

श०—राजा, ही गोष्ट अंगराजास कळविण्याला मजकडून का अवधि लागेल ! जासूद रवाना होऊन एक घटका झाली !

दु०—अरे कोण आहरे तेथें ? जोशीबावांस बोलावूं पाठवा. ( आपल्याशींच डोळा लवतो आहे. )

कं०—जी, आज्ञा सरकार ( बाहेर जाऊन कांहीं वेळानें परत येतो ) महाराजांचा विजय असो, जोशीबावा हजर आहेत.

धोंडजोशी—( सभेंत प्रवेश करून )—राजा.

**आर्या.**

होऊ हताश रिपु तो अनुयायी सज्ज तोषवायास ॥
निशिदिनिं सर्व प्रजांनीं चिंतावें दीर्घ आयुरा यास॥१८॥

दु०—यावें जोशीबावा. डोळा लवल्याची फलश्रुति काय ?

**जोशी**—ऐकावी महाराज.

**श्लोक.**

नारीनरां तोषद भासमान ॥
दोन्हीहि नेत्र स्फुरतां समान ॥
वामें प्रियप्राप्ति कथी सतीतें ॥
सव्यें प्रिया लाभच कीं नरातें ॥ १९ ॥

**दु०**—वाहवा, वाहवा ! वा: जोशीबावा ! आपण तर मोठेच समयज्ञ आहांतसें भासतें. आतां जे बोललां तसें घडणारच ना !

**जोशी**—महाराज ? मीं ह्यांत आपल्या मनचें कांहीं सांगितलें नाहीं. आचार्यांच्या स्वदस्तूरच्या पुस्तकांत जें कांहीं वर्तविलेलें आहे तेंच मीं सरकारास विदीत केलें आहे ( पोथीचें पत्र राजापुढें करून ) हेंच लक्ष्यांत आणावें, म्हणजे उमजेल काय तें आपोआप.

**दु०**—कां मामा, जोशीबावा आतां बोलले तें तुम्हीं ऐकलेंतच, त्या संबंधानें तुम्हास कसें वाटतें ?

**श०**—प्रस्तुतच्या प्रसंगास हें थोडें चमत्कारिक दिसतें खरें, पण आचार्यांनीं हें वर्तविलेलें आहे असें जोशीबावा म्हणतात तेव्हां हेंही थोडें विचारणीयच्च आहे.

**जोशी**—( संतप्त होऊन ) अहो मामा, असें सांदिग्ध कां ( पोथीचें पत्र शकुनीपुढें करून ) आचार्यांवर तुमचा विश्वास आहेना ? हें अक्षर आचार्यांचे हातचेंचना ? आपण ओळख-

तांना ? हें येथून ( ओळीवर बोट ठेवून ) वाचा नीट.

श०—जोशीबावा हा तुमचा रागिटस्वभाव बदलणार तरी कधीं, थोडें थंड व्हा !

कं०—सरकारचा विजय असो ( थैली राजापुढें ठेवून ) अंगराजाचा जासूद बाहेर देवडीजवळ उभा आहे.

जोशी—( राजास लक्षून ) माझें काम झालेंसें वाटतें. पण माझे भाकिताचा प्रत्यय आल्यावर माझें विस्मरण न व्हावें. ( निघून जातो ).

श०—( पत्र वाचून ) जोशीबावांच्या सांगण्याप्रमाणें जमून येण्याचा रंग दिसतो खरा.

दु०—मामा ? तुम्हीही विनोदच का मांडलात !

श०—आपण पत्र पहा म्हणजे तर आपली शंका दूर होईल ना !

दु०—मींच वाचून पाहिलें पाहिजे असें नाहीं. वाचा पाहूं.

श०—" मित्रवर्य, राजाधिराज कौरवेश्वर यांशीं विज्ञप्ती. इकडील काम बहुतेक उरकलें. संकेतस्थळीं लौकरच प्राप्त होईन. कालच्या स्वारींत जयद्रथ राजास एक युवती रूपवती अनूढा आढळली, तिला बरोबर घेऊन ते माझ्या भेटीस आले. त्या अल्लड तरुणीचें रूप पहातां—

### श्लोक.

चंद्रास लाजवित असे मुख पौर्णिमेच्या ॥
सिंहास लाजवित भाग जिच्या कटीचा ॥

मत्ता करीस करि तुच्छ गती जियेची ॥
स्वामींस योग्य गमते रमणीहि साची ॥ २० ॥
मला द्यावया सैंधवें आणिलीही ॥
गमेना गुणे कोणत्याही उणीही ॥
तुम्हां द्यावया बुद्धि मातें उदेली ॥
धरूनी करीं घ्या तुम्ही सौख्य केली ॥ २१ ॥

नवल विशेष भेटी अंतीं विदित होईल.

ही अनुपम रूपवती, आपणावेरी पोंचती करण्यास जयद्रथा व्यतिरिक्त विश्वसनीय दुसरा कोणीच न वाटल्यामुळें सैंधवासच बरोबर देऊन रवानगी करण्याची योजना केली आहे. हे विज्ञापी.

दु०—अहाहा! या स्वारीस मी मोठ्या सुमुहूर्तावर निघालों यांत संशय नाहीं. ज्यांची मला अहोरात्र शंका त्या माझ्या शत्रूंचें निर्मूळ झाल्याचें वर्तमान ह्या स्वारींतच कळलें; माझी प्रिया भानुमती लावण्यानें तशीच गुणांनीं उत्तम हें अंगराजास माहीत असतां अंगराजानें ही तरुणी अनूढा मजकडे पाठविली ही केवळ मनरूप मुशींत ओतलेल्या पुतळीप्रमाणेंच मजकरितांच ब्रह्मदेवानें निर्माण केली असावी असें वाटतें. आतां माझ्याशीं स्पर्धा करणारा ह्या भूमंडलावर कोणी नाहींसा झाल्यामुळें मनाचा निःकाळजीपणा व ऐषआरामास साधनीभूत अंगना प्राप्त होत आहे. केवढा मी भाग्यवान? ईश्वर किती तरी मला अनुकूळ म्हणून मानू!!! मामा तुम्हाला कसें वाटतें.

श०—राजा, आपल्या सारखा दैवशाली जगांत नाहीं अ-

सें आह्मी समजत होतोंच, पण आपण मात्रच त्या खादाडावृकोदराची दहशत बाळगीत असा, पण आमच्या प्रयत्नास यश येऊन पांडवांचेंही भस्म झालें आहे. आपल्यापैकीं कोणा एकाच्या केंसाला देखील धक्का न लागतां शत्रूचा नाश झाला ही अस्मादिकांचीच योजना ना? आपणच सांगा.

दु०—बरें तें असो. जयद्रथ कां अजून येत नाहीं बरें?

कं०—सरकारचा विजय असो, जयद्रथ महाराज वसंतबागेतल्या महालाजवळ म्यान्यापाशीं हजर आहेत, ह्याप्रमाणे थैली हजर करतांनाच ह्या गुलामानें वर्दी दिली.

दु०—हं; हं; मामा, चला तर आपण तिकडेच जाऊं.

( सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

### वसंतीमहाल.

( कर्ण जयद्रथाशीं बोलत आहे, इतक्यांत दुर्योधन तेथें दाखल होऊन— )

दु०—ओहो! अंगराजा, आपण केव्हां आला?

कर्ण—कौरवेश्वरा, काय चमत्कार सांगावा? संकेताप्रमाणें मी प्रयाणाचे बेतांत होतों इतक्यांत, आपला जासूद आला.

आपलें पत्र पहातांच हर्ष पोटांत मावेना, केव्हां आपली भेट होईलसें झालें. मोहिमेकडे कुच करण्याची परवानगी देऊन मी सडाच इकडे निघून आलों तो हा घोड्यावरून उतरलो एवढा-च. कौरवेश्वरा! ज्यांच्या नाशा निमित्त वडिलाशीं निष्ठुरप-णानें भाषण करण्याचाही आपण दोष कबूल केला, ज्यांच्या नाशा निमित्त योजलेले शतशहा प्रयोग व्यर्थ झाले, ज्याच्या नाशा निमित्त शेंकडों कारस्थानें ह्या देहानें योजलेलीं व्यर्थ गेलीं त्या शत्रूंचा समूळ नाश झाल्याचें ऐकून मला तर अगदीं ब्रह्मानंद झाला आहे!!! हस्तनापुरास महोत्साह करूं सांग-ण्यास जासूद पाठविले कांहो मामा? बहुधा नसतील.

**शकुनी**—वः ह्या गोष्टीला का मजकडून अवकाश!

**कर्ण**—मामा, तसें तुम्ही खरेंच केलें असतें तर येथें खुद्द स्वारी असतां महोत्साहाचीं चिन्हें येथें मुळींच कांहो नाहींत?

**श०**—येथें (गुळमुळतो) अहो अंगराजा, अहो.

**कर्ण**—समजलों, समजलों मामा, पुरें करा आतां. जा अ-जून तरी पाठवा जा, जा उठा लौकर.

**दु०**—अंगराजा, खरेंच कांहो माझे शत्रू मेले? (छे) ही गोष्ट खरीच असती तर माझा आनंद त्रैलोक्यांत मावला नसता. आतांही वाटतो, नाहींसा नाहीं. पण राहून राहून मन आशंकतें.

**श०**—मी तरी तेवढ्याचमुळें—

**कर्ण**—अहो मामा! आतां पुष्कळ झालें, अजून नाहीं का सोळा आणे झाली? तें वारुणावतीचें आलेलें पत्र दाखवा पाहूं.

श०—( दफ्तरांतून पत्र काढून कर्णापुढें हात करून ) हें पहा.

कर्ण—( पत्र साग्र अवलोकन करून ) मामा, काय म्हणावें बरें आतां आपल्याला ! तरी अष्टोप्रहर दरबारांतच असतां. अहो 'त्या महालांत सहा प्रेतें होरपळून पडलीं आहेत' असें स्पष्ट लिहिलें आहे. मग शंका ती कोणती अजून ?

श०—( पत्र हातांत घेऊन ) हो खरेंच मी तें पाहिलेंच नाहीं पुरतें.

दुर्यो०—वाहवा ! वाः मामा ! फुकट मला इतका वेळ संशयांत पाडलेंत.

श०—जरा नजर चकली बेटा ! अरे कंचुकी, नागरिकांनीं ध्वज उभारून चंदनाचे सडे घालावे, हरिद्रा कुंकुमाच्या रांगोळ्या काढाव्या, व सायंकाळीं दीपोत्साह करावे म्हणून शहरांत दंवडी द्यावयास सांग, आणि गायक, नरतक, वारांगनादिकांस लवकर पाचारण पाठवून आणीव.

कर्ण—मला तर त्याविषयीं आतां मुळींच शंका नाहीं; या महोत्साहानिमित्त राजास मी उत्तम उत्तम वस्तू नजर करणार; ( थोडा वेळ विचार करून ) आपणास जयद्रथानें धाडलेल्या युवतीहून अत्युत्तम वस्तू कोणती ! ! ! म्यान्याचें दार उघडण्यास जयद्रथास इशारा करतांच, मीनाक्षी दोन दासींसह उतरून डेऱ्यांत जाते इतक्या अवसरांत—

दुर्यो०—(डोळे दिपल्यामुळें चपापून) अंगराजा ? एकाए-

कीं माझे डोळे दिपल्यासारखें मला कशानें झालें कोण जाणें! वीज चमकली काहो!

**कर्ण**—छेः वीज कोठची. मी अनूढा युवती आपणास नजर म्हणून जी धाडिली ती म्यान्यांतून उतरून डेऱ्यांत गेली; या शिवाय दुसरें कांहीं नाहीं. ( असें बोलतांना एकीकडे तें पत्र अवलोकन करीत असतां मधेंच दीर्घ निश्वास टाकतो. )

**दुर्यो०**—कां अंगराजा, आपली चर्या इतक्यांत थोडीशी बदलली! आपण जें अवलोकीत होतां तें वारुणावतीचें मघाचेंच पत्रना? मग आपणास खेद वाटण्याजोगें त्यांत काय आहे बरें? ( पत्र घेण्यास हात पुढें करतों ) पाहूं.

**कर्ण**—( पत्र आपले हातांत राहूं देऊन ) विशेषसें नाहीं कांहीं. पुरोचन असता, व त्यानें कसकसें युक्तीनें शत्रूंस घेरिलें हें त्यानें सविस्तर लिहिलें असतें, आणि तें इत्थंभूत कळतें, म्हणजे अद्याप मन थोडेंसें शंकित आहे तसें न रहातां अधिक आनंद वाटला असता.

**दु०**—अंः जाऊद्याहो आतां. त्या दुष्टांचा समूळ नाश करण्याचा आपला हेतू तो पूर्ण झाला; आणखीं काय पाहिजे!

**कर्ण**—अहो तें तर झालेंच, पण त्या मदोन्मत्त भीमाची, त्या षंढ अर्जुनाची अपेष्टा आपल्या हातांनीं झाली असती म्हणजे मन धालें असतें.

**दुर्यो०**—अंगराजा, आपण म्हणतां तसें तर खरेंच, पण आजच्या आपल्या आनंदाचा उत्पादक तो आपणास सोडून

गेला, आपल्या कारस्थानमंडलरूप कोंदणाचा एक हिरा खचला हें मनांत घोळत असल्यामुळें मलाही वाईट वाटत आहे; पण उपाय काय ? वाहिली ती गंगा आणि राहिलें तें तीर्थ ह्या न्यायास लक्षूनच आतां वागणें भाग झालें आहे हें मनांत आणूनच चाललें पाहिजेना !

**कर्ण**—हो, त्या व्यतिरिक्त समाधानच नाहीं! अस्तु. आतां दरबारचे डेऱ्यांत जाऊं चला ( जयद्रथाचे कानीं लागतो ) सर्व निघून जातात.

---

## प्रवेश ४ था.

### दरबारचा डेरा.

( राजा हस्तनापुराहून आलेलीं पत्रें वाचीत असतां )

**कंचुकी**—( कर्ण येत आहे असे पहातांच ) महाराजांचा विजय असो. असें ललकारतोच आहे तों कर्ण डेऱ्यांत प्रवेश करून कौरवेश्वरा वंदन करितों असें बोलतो ( तें ऐकतांच राजा कर्णाकडे नजर फिरवून पुन्हां पत्र वाचूं लागतो ) आणि बसतो.

**दुर्यो०**—( हातांतलें पत्र खालीं ठेवून ) कां अंगराजा स्वस्थसे बसलां ?

**कर्ण**—आपण विचारांत होतां तेव्हां दुसरें काय करायचें ?

**दुर्यो०**—हें, युवराज दुःशासनाचें पत्र पाहिलेंत का ?

**कर्ण॰**—तें मी तेव्हांच ताडलें. तेंच वाचण्यांत आपण अगदीं गढून गेला होतां. त्या त्रिवर्गास आपल्या शत्रूचे नाशामुळें कांहींएक वाईट वाटलें नाहीं. असें युवराजानें लिहिलेल्या कारणानें आपण साशंक होतां यास काय म्हणावें !

**दुर्यो॰**—अहो आपणास जितका आनंद वाटत आहे त्याच्या शतपटीनें त्या त्रिवर्गास दुःख वाटावें; पण त्यांस मुळींच वाईट वाटलें नाहीं म्हणून संशय !

**कर्ण**—अहो ह्याचें कारण, त्या त्रिवर्गाचा भ्रांतिष्टपणा! ह्याशिवाय दुसरें काय असायचें ? पण आपण देखील तेंच घोंकीत आहां हें नवल वाटतें.

**कं॰**—महाराजांचा विजय असो. आज्ञेप्रमाणें दासींसह बाईसाहेब हजर आहेत. ( मीनाक्षी प्रवेश करून ) खालीं मान करून बऱ्याच अंतरावर अधोदृष्टीनें पहात उभी रहाते. तिच्या मागच्या आंगास सरशाच दासी उभ्या राहतात.

**दुर्यो॰**—( अचलदृष्टीनें तिजकडे बराच वेळ पाहून ) अंगराजा आपल्या पत्रांत आपण जें वर्णन केलें आहे त्याहूनही तेज व चांचल्य विशेष दिसतें. पहा येथें रोष्णाईत कांहीं उणें नाहींना, पण तीवर ( मीनाक्षीस लक्षून ) हिची झांक! सर्व ताऱ्यांच्या प्रभेस फिकें पाडणारी जशी शुक्राची चांदणी तशी ही भानुमतीचे रूपावर, असें भासतें ! आपणास कसें वाटतें, वास्तविक बोला.

**कर्ण**—मला प्रथमदर्शनींच तें तसें दिसलें. मी पुष्कळ त्रि-

या रूपसंपन्न पाहिल्या आहेत पण हिच्या रूपास कोणी लागेल्सें वाटत नाहीं.

**दुर्यो०**—सख्या अंगराजा, मला अलौकिक सुख प्राप्त व्हावें म्हणून ब्रह्मदेवानें स्वतांच ही पुतळी रचली असावीसें वाटतें. अंगराजा, हिनें डेऱ्यांत प्रवेश केल्यापासून मी हिजकडे रेखून पहात आहे. जो जो अवयव ध्यानीं आणावा तो तो अगदीं सुबक ! असावा तसा खुबीदार ! तशांतही वरचेवर अंग विक्षेप करिते, तें पाहून मनाला वाटतें (उठून तिला स्पर्श करण्याचे हेतूनें जातो, राजा धरावयास येतोसें पहातांच मीनाक्षी झपकर निघून जाते ) अँ, अहो वीज लवली कांहो ! मेघगर्जना कां बरें ऐकूं आली नाहीं ? अंगराजा असें काय होऊं लागलें आहे हें !

**कर्ण**—राजा, ही मीनाक्षीची प्रभा ! ती आतांच बाहेर गेलीना !

**दुर्यो०**—मित्रा ती आतां येथें नाहींना, पण तिच्या रूपाचा माझ्या मनावर ठसा कसा उमटला आहे बरें कां? अहाहा !

**आर्या.**

पाहून केशराजी मुखकमला मोद द्यावया आली ॥
राजी मधुप कुलांची वाटे मधुलोभ सक्तकी झाली ॥ २१ ॥
लोचन पाहून हिचे वाटे मीनाक्षि नामसार्थकसें ॥
लाजति कुरंग पाहुनि मनुजा होती कसे न वेधकसे ॥ २२ ॥
अधरोष्ठींचें तेजचि वाटे कीं तोंडल्या त्रपा देतें ॥
शंका नसेचि गमतें नाकीं मौक्तिक परीहि विद्रुमतें ॥ २३ ॥

जीचा वर्ण कपोलीं लाजवितो कीं सुपक्क केळ्याला ॥
फिरवी नयना तेव्हां भासे जणु खोंचितेच उरि भाला॥२४॥
मित्रा अंगराजा मी जें आतां तिचें रूपलक्षण वर्णिलें तसेंच आहे कीं अतिशयोक्ती आहे ?

**कर्ण०**—राजा तिच्या सरीस लागणारी स्त्री ह्या भूमंडलावर दुसरी नाहीं हें माझें मत अगदीं निर्विवाद आहे. असें, मी समजत आहे. तर आपण वर्णन केलें हें अतिशयोक्तीचेंसें मला कसें वरें भासेल ?

**दुर्यो०**—आणखीं पहा अंगराजा.

### श्लोक.

नाकीं तें सरलत्व पाहुनि वहू की खेद वाटे शुका ॥
लापा ऐकुनिये खरें कशि पहा मूर्छाच त्या बा, पिका ॥
कैसें पीन विशाल वक्ष पारितें सारें कुचीं व्यापिलें ॥
वाटे कौतुक कीं कसे अझुन ते कोणी नसे स्पर्शिले ॥ २९ ॥

### आर्या.

दिसती वर्तूळ पहा कठिण कसे उंचसेच मित कुचते ॥
रुततिल उरास ज्याच्या धन्य जगीं तोचि, अन्य पामरते॥२६॥

( बोलत बोलत कर्णाच्याजवळ जाऊन त्यास आलिंगन देतो आणि दीर्घनिश्वास टाकून व्याकूळ पडतो. )

**कर्ण०**—राजा, सावध हो, सावध हो, धीरपुरुषांनीं इतकें मोहित होणें योग्य नाहीं.

**दुर्यो०**—मित्ता अंगराजा, मी मोहीत झालों आहें असें ना-

हीं. ज्या वस्तूच्या केवळ दर्शनानें माझ्या हृदयांत इतका टळ-टळीत ठसा उमटला आहे अशी ही आपण मजला नजर केलीत त्या योगानें मला जो हर्ष झाला तो वास्तवीकपणानें आपणांस प्रदर्शित करावा एतदर्थ मीं आपणास आलिंगन दिलें.

**कर्ण०**—हँ हँ हँ हँ ! ( विनोदयुक्त स्वरानें हंसत हंसत ) आनंद प्रदर्शित करण्याचीही अपूर्व तऱ्हा मी आजच पाहिली !

**दुर्यो०**—अं: तें असो कांहींही. आणखीं आठवण झाली तें सांगतों.—

**श्लोक.**

शुंडाकृती ते भुज सत्य जीचे ॥
वर्णेंच ती केतकि पुष्प साचें ॥
कटि जिची लाजविते हरीला ॥
गती त्रपा देत सदां करीला ॥ २७ ॥
पृथु नितंब नितंबिनि त्यावरी ॥
वरिवरी करि ती निरि सांवरी ॥
कदलिखांबच कीं उरु भासती ॥
चपल ही विज ती सित भा सती ॥ २८ ॥
तरुणी नवनीत कोमलांगी ॥
शयनी हे जरि लभ्य होय दैवें ॥
अवनीतल हेचि नाक मानू ॥
नमनीं जिष्णु वनीं विनोद तृष्णा ॥ २९ ॥

असें वर्णन करतां करतां त्याचे शरीरांत कामज्वरानें संचार

केल्यामुळें डोळे लाल झाले, आणि मीनाक्षी जशी कांहीं जवळच आहेसें समजून चुंबन घेऊं लागला. हें पहातांच

**कर्ण**—कौरवेश्वरा, हें काय! भानावर या, भानावर या, असे काय हें.

## आर्या.

अंतःपुरिं जाइ अतां कामें तुज व्यापिलें वदे चर्या ॥
धृतिनग होउं पहाशी जिरवाया परि जिरे न तो आर्या ॥३०॥
तुजहुनि थोर न कोणी मदनच हो सत्य तूच ह्या रतितें ॥
भोगीं सौख्य जसें तुज व्हावें तैसेंच अन्यजन परतें ॥ ३१ ॥

**कं०**—महाराजांचा विजय असो (थैली पुढें ठेवून) सुशर्मा महाराजांचा जासूद बाहेर उभा आहे.

**कर्ण**—(पत्र वाचून) मामा, संकेताप्रमाणें कुच करण्याची तयारी करवा. राजास आणखी कांहीं जरूरीच्या प्रकरणाची सूचना करावयाची होती पण त्याचें चित्त आतां व्यग्र झालेलें आहे व गांठ केव्हां पडेल हेंही निश्चित नाहीं. अस्तु, मला तर गेलेंच पाहिजे. (सर्व निघून जातात.)

---

## प्रवेश ५ वा.

### अंतःपूर.

(दरबारच्या डेऱ्यांतून परत आल्यावर कांहीं वेळानें)

**विहंगिका**—कांग तरलिके बाईसाहेबांनीं डेऱ्यांत पाऊल टाकतांच तुला कसें वाटलें.

**तरलिका**—तें काय विचारूंच नको, जरी आपली नजर मेलेली आहे तरी मला कससंच झालें बाई. पण बाईसाहेब येवढ्या देखील डगमगल्या नाहींत.

**विहं०**—आपण डेऱ्यांत पाय टाकल्यास घटका देखील लोटली नाहीं तोंच. थोरले सरकार कसंग करूं लागले ते ?

**तर०**—अग विस्तवाजवळ लोणी ठेवलें तर वितळल्या शिवाय राहील का ! तशांत आणखीही कांहीं कारणें होत गेलीं तसें होण्यास.

**विहं०**—हा मेले ! हें तूं अगदींच अघटीत काढलेंस. मी नाहीं तें उमजलें अजून. कसं कायग बरं ऐकूं तर दे काय तें.

**तर०**—अग तें झांकल कां आहे ? आपल्या डोळ्यापुढेंच आहे काय तें.

**विहं०**—असंग काय पडद्या पडद्यानं बोलतेस.

**तर०**—अग पडदे कसचे ( मीनाक्षीकडे नजर करून ) हेंच तें, आणखी काय असायचं आहे !

**विहं०**—हंसत हंसत ( मीनाक्षीकडे पाहून ) होजि हो खरंच, बाईसाहेबांचें रूप तर केवळ चंद्रजोतच आहे. पण दुसरेंच आणखी आहे. तें नाहीं वाटतें तुझ्या ध्यानांत आलें ? मीं तें तेव्हांच ताडलं ( मीनाक्षीकडे पाहून अंमळ मोठ्यानं हंसते ) मीनाक्षी हंसत हंसत आळस देत्ये.

तर०--हं हं ! समजलं ग समजलं. बाइ पणांत आल्यावर घटका देखील वैरिण होते, आणि युगासमान भासूं लागत्ये बरं का!

कंचुकी—महाराजांचा विजय असो. ( दासी उठून उभ्या राहतात तों राजा अंतःपुरांत आलासें पाहून आपण बाहेर होतात.)

श्लोक.

नृपा देखतां मंचका सांडि बाला ॥
उभी वामपार्श्वी न पाहे खळाला ॥
जरी भूस लक्षी तरी ती थरारे ॥
जशी केळ ती सूटतां घोर वारें ॥ ३२ ॥

राजा— ( बसे भूप शेजे ) म्हणे रुष्ट कांगे ॥
प्रिये खिन्नशी दीसशी तूं वियोगें ॥
असें दुःख जें गे तुझ्या मानसीं तें ॥
स्वयें सिद्ध हा दास तें वारण्यातें ॥ ३३ ॥

मघांशी हिची जशी चर्या दिसत होती तशी आतां नाहीं. आतांची कांहीं वेगळीच, खुबीदार व उग्र अशी होण्यास दासींनीं अवज्ञा केली असावीसें वाटतें. अं: त्यांचें पारिपत्य करण्यास मला काय अगाध आहे ! अरे, कोण आहेरे, जा त्या दासींना घेऊन ये.

कं०—जी आज्ञा सरकार ( दासींस आंत हजर होण्यास खुणावून ) ह्या हजर आहेत.

तर०--( कांपत कांपत ) सरकारचा जयजयकार असो.

राजा—कांग मघापेक्षां हिची रुष्ट मुद्रा होण्यास काय का-

रण झालें? कशा अशा मूर्ख तुम्ही ! बोला लवकर काय झालें तें; नाहींतर अत्तां सांगतों कसं काय तें; बोला लवकर.

**विहं०**—( अन्याय पोटांत घालणार धनी मायबाप आहेत) महाराज, सरकार स्वारी येईपावेतों आमच्याशीं बाईसाहेब आनंदानें बोलत होत्या. आमच्या हातून अमर्यादा झाली नाहीं.

**राजा**—हं हं, तर मग जा तुम्हीं ( बाहेर जातात ) कदाचित असें असेल. हो, हेंच. संशय नाहीं; समजलों.

**श्लोक.**

तव मनिं गमतेंगे वाटतें मी स्वहातें ॥
धरुनि तुज म्हणावें सेवि अंकासनातें ॥
मम मनि प्रियजें तें दाविशी मौनभावें ॥
श्रवण मग कसेंगे हे प्रिये तृप्त व्हावे ॥ ३४ ॥

( इतकें झालें तरी ती कांहींच बोलत नाहींसे पाहून ) मानिनी स्त्रियांचे मनांत असें येणें योग्यच आहे ( तिला धरावयास जातो पण स्पर्श करववत नाहीं. असें भासतांच मंचकावर येऊन बसतो ) पुन्हां.

**श्लोक.**

असे काय तृष्णा कथीं या जनाशीं ॥
असें सिद्ध पूर्वाविया कामनेसी ॥
नको वेळ लावून अतां गूणराशी ॥
त्वरें सोत्सवेंदे प्रिये चुंबनाशी ॥ ३५ ॥

( असें बोलून चुंबन घ्यावें ह्या इच्छेनें तिला स्पर्श कराव-

यास जातो पण पूर्ववत् माघारा येऊन पलंगावर बसतो आणि पुन्हा तिला लक्षून )

श्लोक.

तुझ्या अंगसंगें मला सौख्य व्हावें ॥
म्हणूनी करीं मी प्रयत्ना स्वभावें ॥
करूं स्पर्श जातांच का अग्नि भासे ॥
तनूही तुझी सांग गे बीज कैसें ॥ ३६ ॥

( राजा जसजसा बोलत आहे तसतशी मीनाक्षीला कामज्वराची बाधा अधिकच होत होत शेवटीं तिचीं वस्त्रें विगलित होत चाललीं त्याचें तिला भान नाहींसें झालें तरी ह्या गोष्टीकडे राजाचें लक्ष न जातां आपल्याच छंदानें पुन्हा )

श्लोक.

शरीरीं तुझ्या रोगरायी न कांहीं ॥
गमे त्यास ज्याच्या मनी काम नाहीं ॥
मला भासशी कां? च अग्नी समान ॥
कळेना तरीं बीज शस्त्रें वधीन ॥ ३७ ॥

(असें तिला राजा धमकावितो तरी ती बोलत नाहीं. म्हणून खड्ग उसपून तिच्या अंगावर जातो. राजा मारावयास आलसें पहातांच मीनाक्षी घाबरी होऊन मूर्छित पडली. हें पहातांच घाबरून)

**राजा**—कंचुकी, दासींस हांक मार. मार लौकर.

**कंचुकी**—आज्ञा सरकार. ( दासींसह हजर होऊन ) जी हजर आहेत.

**राजा**—रे ह्या माझ्या प्रियेस एकाएकीं काय झालें, हें लौकर पहायास सांग. मी अद्याप तिला स्पर्श केला नाहीं, किंवा शब्दानें देखील दुखवलें नाहीं; असें असतां हिला काय झालें, हें, त्या खोलींत तिला घेऊन जाऊन पहावयास सांग. व काय विकार आहे तो कळतांच मला सांगावयास ये.

**कं०**—आज्ञा सरकार. ( कांहीं वेळानें परत येऊन ) जी सरकार. जी मायबाप. बाईसाहेबांची, जी बाई बाई सा सायबा.

**राजा**—रे असा घाबरलास काय ? चावळतोस काय ! नीट सांग काय असेल तें; म्हणजे धन्वंतरी यास आणवीन. बोल काय तें नीट.

**कं०**—कोणते दुसरें धन्वंतरी सरकार ! आपल्या पदरच्या धन्वंतऱ्यांस मामासाहेब तेथें घेऊन आले आहेत. त्यांनीं छातीला हात लावून पुडी दिली, पण, कांहीं नाहीं. बाईसाहेबांचे डोळे फारच चढून गेलेलें पाहून वैद्यबावांनीं कयास केला कीं ही बाहेर बाधा आहे. असें कळतांच पंचाक्षरी आणण्याकरितां मी निघालों तो इकडे आलों सरकारला कळवायला.

**राजा**—बरें मी तजवीज करवितों कांहीं, पण तुला ही कोणी जाणता माहीत असेल तर पहा.

**रा०**—( आश्चर्यानें ) काय चमत्कार असेल तो असो ! अशी रूपसंपन्न तशांत अनूढा कर्णास लाधलेली, त्यापासून ती

हिराहून घेण्याची छाती कोणत्याही शस्त्रधराची नाहीं, अशा वीरानें स्वसंतोषानें मला अर्पण केली हें आश्चर्य, पण कर्णाचे हातून ती मला प्राप्त झाली म्हणून मी मोठा दैवशाली असें जन म्हणू लागतील ह्या विषयीं तर मला शंकाच नव्हती, पण हें मध्येंच अतर्क्य विघ्न उद्भवलें. माझा धन्वंतरी कांहीं सामान्य नव्हे. मांत्रिक प्रकरणांतही त्याचा कोणी हात धरूं शकत नाहीं, पण त्यानेंही हात टेंकले, तस्मात् हें कांहीं तरी विपरीतच असावेसें वाटतें; काय असेल तें असो! ( ओंठास तर्जनी लावून कैऱ्या नजरेनें छताकडे टक लावून पलंगावर संचित पडतो. )

कं०—ह्या दासास ह्यासमयीं कांहीं अपूर्व गोष्ट कानावर घालण्याची परवानगी असावी.

राजा—( रागाचे तिरमिरीनें उठून अवेशानें ) कसारे मूर्ख तूं! ह्या समयास माझ्या प्रियेचें दुःख दूर झाल्याचें अगर तें कोणत्या उपायांनीं दूर होण्याजोगें आहे ते उपाय सुचविण्याचें एकीकडे ठेऊन ( तोंड वांकडेंसें करून ) अपूर्व गोष्ट कानावर घालण्याची परवानगी मागण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं! जा, जा, नीच माझ्या समोरून!

कं०—अन्याय पोटांत घालणार आपण धनी समर्थ आहांत. ती गोष्ट तरी बाईसाहेबांच्या संबंधीची आहे. कळविण्यास आज्ञा असावी.

राजा—तर मग बोल काय तें झटपट.

कं०—सरकार, बाईसाहेबांचे प्रकृतीस उपाय करतां करतां धन्वंतरी थकले, पंचाक्षऱ्यांनीं हात टेंकले, देवस्के तर गाशा गुंडाळून पळाले, त्यामुळें सर्वांचीं तोंडें सुकून गेलीं आहेत, आमच्या तोंडचें तर पाणीच पळालें; पुढें जेमतेम करतां करतां मला एक फिरस्ता गोंसावी भेटला, त्याचे चर्येवरून, बाईसाहेबांचे दुःख निवारण करील तर तोच करील असें मला वाटलें, म्हणून मी त्यास तेथें घेऊन गेलों; पण आह्माला तेथून धुडकावून लावलें, पण मला वाटतें सरकारांनीं त्या बावास पाहिलें म्हणजे त्या बावाविषयीं माझें मन जशी गाही देत आहे तसेंच सरकारचेंही देईल असें खास वाटतें. आज्ञा होईल तर त्या महंतास समक्ष हजर करितों.

राजा—जा त्यास घेऊन ये पाहूं ?

कं०—जी सरकार, ( कांहीं वेळानें गोंसाव्यासह परत येऊन ) सरकारचा जयजयकार असो. महंतबावा हजर आहेत.

राजा—( गोंसाव्याकडे बराच वेळ टक लावून पाहिल्यावर आपल्याशींच ) अरे ! मजसारख्याचें अंतःकरण सकृत्दर्शनींच यानें वेधिलें इतकेंच नाहीं तर ह्या विभूतीचे दर्शनानें माझ्या मनांतला खेद जाऊन चित्तवृत्ती आतांचे आतांच उल्हासयुक्त झाली आहे. तस्मात् हा माझ्या प्रियेचें दुःख निवारण करील यांत संशय नाहीं. पण ह्यास येथें येऊन सुमारें एक मुहूर्त होत आला तरी अद्याप तो होऊन कांहींच बोलत देखील नाहीं मग कांहीं मागणें तें तर लांबच राहिलें. पाहूं गेलें

तर ह्याची वृत्ति निष्काम, मग त्याला आह्मापाशीं काय मागा-
वयाचें? "जगाच्या कल्याणा संताच्या विभूति" ह्या रूढ
वचनाच्या दृष्टीनें त्याचें वर्तन योग्य दिसतें. अद्याप देखील तो
कांहीं चकार शब्द देखील काढीत नाहीं! अस्तु. आपणच
होऊन बोलावें.

श्लोक.

गमशी मज सखा तूं आप्त तूं योगिराया ॥
तुजविण जन सारे पातले शीणवाया ॥
हरिशि मम प्रियेचें दुःख तूं सत्य वाटे ॥
स्तवन तव कराया खंति ना कंठ दाटे ॥ ३८ ॥

हे महा पुरुषा, ह्या समयास तूं प्रत्यक्ष ईश्वरच मला भेट-
लास असें वाटतें. हे योगिन् मजवर दया करून माझ्या प्रि-
येचें दुःख निवारण कर. तूं जें मागशील तें देईन.

योगी—( हास्य करून )

आर्या.

संग्रहिच्या सद्वैद्यां वंचुनियां तूच कानफाट्यातें ॥
इच्छिशि यश हें वाटे कुतुहल कीं पुष्प शुष्क फांट्यातें ॥३९॥

राजा— आर्या.

आर्या मासरिा मातें धन्वंतरि मूर्त अश्विनीकुमर ॥
करुनी कृपा दयाब्धे सुखवी मिनाक्षि वारि ताप दर ॥ ४० ॥

यो०—अशीच तुझी इच्छा असेल, तर यत्न करून पहा-

तों. पण एकदोन दासींशिवाय त्या बाईजवळ अधीक कोणी असतां कामा नये.

रा०—आपले मर्जीप्रमाणें बंदोबस्त ठेववितों. कंचुकी, जा, सर्व प्रकारें त्या योग्याचे सांगण्याप्रमाणें बंदोबस्त ठेवण्यास मामांस सांग, आणि तूं तेथें जवळपास ऐस. काय कमीजास्त होईल तें लागलींच मला कळीव.

कं०—आज्ञा सरकार. (निघून जातो. एक मुहूर्तानें परत येऊन) सरकारचा विजय असो. आज्ञेप्रमाणें सर्व बंदोबस्त करवून गोसावीबावांस बाईसाहेबांची प्रकृती दाखविली. बावांस पाहून त्या प्रथम मोठ्यानें खदखदा हंसू लागल्या व कांहीं अंगविक्षेपही करूं लागल्या तेव्हां मी अगदीं चपापलों. पण त्या महाराजांनीं बाईसाहेबांकडे दयार्द्र दृष्टीनें पाहून त्यांच्या सर्वांगावरून विभूतीचा हात फिरवतांच बाईसाहेबांच्या अंगाला शहारे आल्याप्रमाणें झालें. आणि त्यांच्या अंगांतला ताप उतरला. डोळ्यांची लाली उतरून दृष्टी शांत झाली आणि विकसितकुमुदासारखे बाईसाहेबांचे नेत्र त्यांच्या मुखास अपूर्व शोभा देऊं लागले आहेत. आणखी ते महंतबावा आपल्या झोळींतून कांहीं काढून बाईसाहेबांच्या तोंडांत घालीत होते इतकें पाहून झालेली कृति सरकारचरणीं विदित करण्यास हजर झालों.

रा०—शाबास माझे मनास होत असलेलें दुःख निवारण्यास तूं कारण झालास हें माझ्या ध्यानांत आहे. तुझें कल्याण

होईल. फिरून तूं तिकडे जा, आणि माझ्या प्रियेची प्रकृति अगदीं निकोप झाल्याची सुवार्ता घेऊन ये.

**सुंदरक**—सरकारचा विजय असो. बाईसाहेबांस आराम होऊं लागल्याची सुवार्ता सरकारचे कानावर आलीच आहे. पुढें त्या महंतबावांनीं बाईसाहेबांस कशाचेंसें भस्म खावयास दिलें, व तेंच सर्वांगास फांसलें व त्यांचे कानांत कायसें सांगूं लागले तोंच बाईसाहेबांचा डोळा लागला व ते बावा तेथल्या-तेथेंच दिसेनातसे झाले. इतक्यांत बाईसाहेब जाग्या होऊन मंचकावर बसून दासीबरोबर बोलूं लागल्या. सरकार गुन्हा माफ करणार धनी समर्थ आहेत. बाईसाहेबांच्या मुखाकडे पाहिलें तों त्यांचे तोंडावर पहिल्यापेक्षां दुप्पट तेज चढलें आहे. आणि मोठ्या आनंदानें दासीबरोबर बोलत बसलेल्या पहातांच आनंद वाटून ही सुवार्ता सरकारच्या कानांवर घालावी ह्या हेतूनें निघणार तोंच त्या योगिराज महाराजांचा तपास करून त्यांस घेऊन येण्याविषयीं बाईसाहेबांनीं फर्माविल्याप्रमाणें निघालों तसाच सरकारचे चरणांजवळ हजर झालों आहे.

**रा०**—शाबास, शाबास, ( प्रत्येकास एकेक रत्नखचित मुद्रिका बक्षीस देतो. ) आतां त्या महंतबावांचा तपास करून त्यांस महालाकडेस घेऊन या; मी तिकडेच जातों. ( निघून जातो, दोघेही भालदार सांगितल्या कामगिरीस जातात. )

---

# प्रवेश ६ वा.



## अंतःपूर.

मंचकाचे डावे बाजूस निपुणिका व उजवे बाजूस प्रियंवदा आणि मध्यें पलंगावर मीनाक्षी अशा आनंदांत गोष्टी सांगत बसल्या असतां राजा येतोसें पाहून—

**निपुणिका**—(डोळ्यांनीं खुणावून) प्रियंवदे मागें पाहिलंस का (उभी रहाते.)

**प्रियंवदा**—(मागें पाहून) अं, सरकार स्वारी! (उठून बाहेरचे अंगास होते, निपुणिकाही तसेंच करिते. राजा नीट आपले पलंगाकडेच येतोसें पाहून मीनाक्षी पलंगाचे दुसऱ्या अंगास खालीं उतरून मर्यादितपणानें जमिनीकडे नजर ठेवून मोठ्या गंभीरतेनें उभी रहाते. राजा पलंगावर बसून मीनाक्षीस नीट न्याहाळून पाहून तिला लक्षून—)

**राजा**—

### आर्या.

त्वन्मुखकमलामोदस्वादु मधुप तिष्ठतोंच घ्याया मी ॥
अविलंबें येउनिगे निववीं सखये जनास या कामी ॥ ४१ ॥

(असें बोलून मोठ्या उत्सुकतेनें मीनाक्षीकडे पहातो मीनाक्षी ही वरचेवर राजाकडे नजर फिरविते पण भाषण करीत नाहीं. म्हणून पुन्हां)

## आर्या.

इच्छा असेल मनिं ती पुरवाया सिद्ध जाहलों दास ॥
भ्रुकुटी कमाण चढवुनि दावुं नको रोष हांस खेदास ॥४२॥

( असें राजाचें भाषण ऐकतांच मीनाक्षी स्मितपणें डाव्या अंगावर मुरकते. )

**राजा**—( मीनाक्षीनें आपल्याकडे पाठ केली असें पाहून आश्चर्यानें थोडा वेळ विचार करून ) अं, हं हं समजलों, समजलों यांत तुझी चुकी नाहीं.

## आर्या.

मानिनितें निजहातें नाथें प्रथमचि धरून सन्मानें ॥
कथिलें अनंगरंगीं घ्यावें चुंबन सदैव सुमनानें ॥ ४३ ॥

( उठून तिला कवटाळण्याच्या बुद्धीनें जातो पण आतां देखील तिच्या अंगास स्पर्श करवत नाहीं असें भासतांच पूर्ववत पलंगावर येऊन बसल्यावर संतापून——

## आर्या.

दुष्टे, डांखिणि, जोगाणि, यक्षिणि बनलीस सत्यतन्वंगी ॥
रूपें द्विगुणित जैशी तैशी सजलीस धूमशिखि अंगीं ॥४४॥
वद वदगे सत्वर तूं धरिशि असें रूप तूं कशालागे ॥
सांगशि खरें न धरिशी मौन तरी पाठिशी कशालागे॥४५॥

(हातांत चाबुक घेऊन येतोसें पहातांच मीनाक्षी घाबरते आणि—

**मीनाक्षी**—हे देवा आतां तूंच वाली ! ! ! ( राजा जवळ येऊन ठेपलासें पहातांच भारदस्तपणानें आणि मर्यादसीलतेनें. )

आर्या.

अभयचि मिळतां आहें कळवाया सिद्ध तत्त्व चरणांस ॥
शरणागत रक्षण ह्या लक्षाहो नाथ क्षात्रधर्मासा ॥ ४६ ॥
आणखी—

श्लोक.

मारोनी मजला न सौख्य लवही कीर्ती न कीं लाभ हा ॥
विप्राची दुहिता अजाण अबला ताडून दोषी न व्हा ॥
ऐकोनी विनती दयार्द्र हृदये बालेस या रक्षितां ॥
वाटे ईश कृपेंच इच्छित सुखा न्यायेंच कीं पावतां ॥४७॥

**राजा**—पहिल्यानें मी तुझी विनवणी केली, आतांही बरीच केली, तरी एक शब्द देखील तुझ्या मुखावाटें बाहेर पडला नाहीं म्हणून फार क्रोध आला होता, पण आतांचे तुझ्या मधुर व मंजूळ वाणीनें कर्णचकोर तृप्त होऊन तुझी वाक्कुशलता पाहून रागही शांत झाला, पण कामानलानें शरीर फार संतप्त झालें आहे हें तुझ्या कोमल मृदुपल्लवत् गात्रांच्या संगानें शांतविण्या निमित्त तुझ्या तनूला स्पर्श करण्याच्या हेतूनें तुझ्या अंगास स्पर्श करूं लागलों म्हणजे तुझें अंग मला विस्तवासारखें भासतें. तुझ्या आसमंतभागीं माझ्यानें उभें देखील राहवत नाहीं, मग अंगास स्पर्श करणें कोठचें! तर आतां मजवर दया करून तूं मला कोणत्या उपायांनीं प्राप्त होशील तें सांग.

**मीनाक्षी**— श्लोक.

ज्यानें ताप हरून सर्व तनुही केली सुखी त्या महा. ॥

योग्यानें उपदेशिलें मज महा कामारि मंत्रें पहा ॥
त्याचा हा महिमा तुम्हा मजगमे वारी वरा आयका ॥
दासीच्याच मुखें तुम्हां विदितहो ! 'राया' प्रजानयका ४८

**राजा**—कायगे प्रियंवदे काय वर दिला त्या जोगड्यानें ? कांगे कां बोलत नाहींस.

**प्रियंवदा**—जी, सरकारचा इजय हो. अन सरकार ते बावानें बाईसावांच्या कपाळीं इभूत लायली, त्याचे कान फुंकल, अन बगा त्ये.

**राजा**—कशीग अशी मूर्ख तूं घावरत्येस, कां कांपायला काय झालें, भिऊं नको नीट सांग काय तो म्हणाला तें.

**प्रियंवदा**—जी, मायबाप चुकी माफ करणार धनी समर्थ आहेत. मग सरकार ते योगीबावा म्हणाले—

### श्लोक.

जंवरि विधिविधानें लग्न नाहींच झालें ॥
तंवरि तुज स्मराचा वेध लागे न बाले ॥
अनय करुनि तूं तें भोगु इच्छील त्याशी ॥
तर्यिच निमिष अर्धे काळ दंडील त्याशी ॥ ४९ ॥

**सुंदरक**—सरकारचा विजय असो. अंगराजाच्या थैलीचें मला प्रातःकाळीं स्मरण दे. अशी आज्ञा झाली होती.

**राजा**—हा मूर्खा, माझ्या संग्रहींचा तूं ! आणि तुला यत्किंचितही तारतम्य किंवा धोरण नाहीं ! अरे प्रातःकाळचा का

समय हा ! कुठें गेली तुझी अक्कल. तूं गुंगींत आहेस वाटतें, नीट शुद्धीवर ये !

**सुंदरक**—सरकार गुन्हा माफ करणार आपले पाय आहेत. सरकारचा हा चाकर आज्ञा पालण्याचें महत्व काय हें लक्ष्यांत धरून वागत आहे. महाराज—

**श्लोक.**

तिथी आज कीं पौर्णिमातीच माहा ॥
निशीनाथ अस्तास गेला पहा हा ॥
नभी नादिसे एकही स्पष्ट तारा ॥
प्रभातीं पहा सूटला गार वारा ॥ १० ॥

**रा०**—तर काय खरेंच उजाडलें ! बरें तर मला कळविलेंस तसेंच मामांस कळींव जा.

**सुंदरक**—जी सरकारचा विजय असो. ( निघून जातो. )

**रा०**—प्रियंवदे, तूं काय बोललीस मघांशीं, पुन्हा म्हण काय तें.

**प्रियंवदा**—जी सरकार.

**श्लोक.**

जंवरि विधिविधानें लग्न नाहींच झालें ॥
तंवरि तुजस्मराचा वेध लागे न बाले ॥
अनय करुनि तूतें भोगु इच्छी तयाशी ॥
तयिंच मग क्षणार्धें काळ दंडील याशी ॥ ११ ॥

इतकें झाल्यावर ते महंतमहाराज जाऊं लागले तेव्हां या

बाईसाहेबांनीं केउलवाणें तोंड करून त्या बावांचे घट्ट पाय ध-रले, आणि फारच आळ घेतली तेव्हां त्यांस दया येऊन ते म्हणाले. " मूली तूं रडूं नको थोड्याच दिवसांत तुझें विधि-युक्त लग्न होऊन तूं संसारसुखांत पडशील. " तरी ह्या त्याचे पाय सोडीनात. तेव्हां असा कांहीं चमत्कार झाला कीं बाई-साहेबांस तेथल्यातेथेंच झोंपेची गुंगी आली आणि आमच्या देखत देखत ते महंतमहाराज तेथेंच गुप्त झाले.

रा०—मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. असो काय असेल तें! ( मीनाक्षीकडे पाहून ) तूं ब्राह्मणाची कन्या म्हणत्येस त्या अर्थी तुझें विधियुक्त लग्न कोणत्या तरी ब्राह्मणाशीं होणार त्यापासून मला तुझा काय उपयोग पडणार! तेव्हां सांप्रत तु-जमुळें मला दुःख मात्र होत आहे, अशी दुःखमूलक जी तूं त्या तुझा वध करून दुःखमुक्त व्हावें हेंच बरें. ( तरवार उसपून मारावयास उगारतो )

मीनाक्षी—( न घाबरतां )

### आर्या.

दूषितजन वृत्तातें ऐकुनि न्यायेंच दंडितां त्याशी ॥
विनती पुरी न ऐकुनि, वधितां कैसे अनाथ अबलेशी॥१२॥

रा०—मी हिला मारण्याकरितांच खरोखर तरवार उसप-ली पण हात कां बरें वाहात नाहीं! बरें ही काय म्हणत्ये तें ऐकूं. हं, बोल तुला काय आणखी विनती करावयाची राहि-ली असेल ती; बोल लौकर?

मीनाक्षी— श्लोक.

केली बाळपणीं करूं उपवनीं आह्मी तिथें पातला ॥
नेणों काय कशीच बुद्धि सुचली तैं त्या द्विजाचा मुला ॥
मातें येउनिया म्हणेच सुगुणे प्रेमे वरी तूं मला ॥
देखोनी विपरीत बुद्धि तैं म्या क्रोधेंच धिःकारिला ॥ ९३ ॥

रा०—बरें, झालें असेल तसें, मग ह्यांत विनती ती कोणती?

मी०—तो आणखी काय बोलला तें ऐकिलें म्हणजे येईल ध्यानांत कोणती ती.

रा०—बरें तर बोल काय तें.

मीनाक्षी— आर्या.

वरिशी मला न तूं तरि द्विजसुत कोणी दुजा तुला न वरी ॥
ऐसें बोलुन गेला न कळे कोण्या दुजा वनीं विवरीं ॥ ९४ ॥

रा०—वाहवा! हें फार चांगलें झालें, आतां ब्राह्मणाबरोबर तुझा विवाह होण्याची शंका देखील राहिली नाहीं. आतां तूं मला गांधर्वानें वर म्हणजे झालें.

मी०— आर्या.

स्वामी दीनजनाचे राया, वदतां कसेंच भलतें हें ॥
अनघा विप्रसुता मी देवा! अनयास चित्त भीतें हें ॥ ९५ ॥

राजा—हें तुझें धार्मिकपणाचें बोलणें विशेष संतापास मात्र कारण होत आहे म्हणून तुला सांगतों आणखी एकवार, आणि हें तरी तूं ब्राह्मणाची मुलगी म्हणतेस त्यामुळें, कीं जेणेंकरून तूं मला प्राप्त होशील असें कांहीं बोलणें असेल तर

बोल. बोल लवकर काय तें, नाहीं तर ही ( तरवार तिच्यापुढें करतो ) उपसली पहा.

**मीनाक्षी**— श्लोक.

त्वरें आणा माझ्या विनवुनि पुसोनीच पितरां ॥
तयांच्या आज्ञेनें सविधि धरि राया मम करा ॥
श्रुती-सोपानातें त्यजुनि गड घेऊंच बघशी ॥
तरी सौख्यागारा किमपि च कुमार्गें न पवशी ॥ १६ ॥

**राजा**—हो, हो; खरेंच हा मार्ग आहे. व तसें करणें मला कांहींच कठिण नाहीं, अरे कोण आहेरे ? मामास बोलावून आण. मी अंगराजास पत्र लिहितों म्हणजे झालें.

**कंचुकी**—जी, सरकार. महाराजांचा विजय असो (निघून जातो, मागून सर्व निघून जातात.)

---

## प्रवेश ७ वा.

**स्थळः—वारुणावती, वसंतमहल.**

( एक वृद्ध ब्राह्मण देवडीवाल्याच्या जवळ जाऊन मोठ्या काकुळतीनें )

**ब्राह्मण**—जमादारबावा, अहो जमादारबावा, अहो राजाची भेट व्हावी म्हणून आज चार दिवस उपाशीं, पोट बांधून राजाच्या स्वारी मागें मागें अनवाणी धांवतों आहें, पण मजकडे

कोणी बाबा पाहिलें देखीलहो नाहीं. मग बोलणें कोठचें ? आज तुह्मी दृष्टीस पडलां तेव्हांच मनाला वाटलें कीं हे जमादार भले सज्जन आहेत, हे खचीतच आपली दाद लावतील असें वाटून तुमच्यावेरीं आलों आहें. तुमची भल्या माणसाची गांठ पडली म्हणून तुह्मीं उभें तरी राहूं दिलेंत हें तुमच्या भलेपणास शोभतें. कसें झालें तरी भला तो भलाच, तुमचे देव कल्याण करील, तुमच्या मुलांबाळांस तो जगदीश सुखी ठेवील. अब ब ब ब ! ! ( जमिनीशीं हात टेंकीत टेंकीत खालीं बसतो ) देवा तूं ! जगदीशा, ह्या जमादाराचें कल्याण कर. खरोखर गरीब, अनाथदुर्बलादिकांची ह्मास दया येते खरी.

**जमादार**—तुमच्या सारख्यांची ही अशी स्थिति पाहिली म्हणजे मला पुष्कळ वाईट वाटतें; पण काय करावें ! आमची चाकरी म्हणजे सुळावरची पोळी ! मालकाची मर्जी संभाळतां संभाळतांच पुरेवाट होते. बरें महाराज, हा जो किनखाबी डेरा दिसतो तेथें आपण जाऊन बसा. सरकार सवारी उठण्याची वेळ झाली, तेथें आपण सरकारांस भेटा आणि काय बोलावयाचें असेल तें बोला. जा. उठा.

**ब्राह्मण**—ओ यो यो यो यो ( एक पाय लांब करून ) हा पाहिलात कां केवढा पेटका आला तो ? रे देवा ! आयाई ! हें पाहिलेंतना ! अनवाणी उन्हातान्हांतून राजाचे स्वारीमागें धांवतां धांवतां ( तळपाय बोटानें दाखवून ) कसे फोड आले आहेत ते ! ! पाहिलेंतना ! देवा तूं. ( दुःखानें रडूं लागतो. )

**जमादार**—अरेरेरेरे! महाराज! आपल्याला दुःख होतें हें आम्हाला दिसतें, पण काय करावें! ह्या अंतःपुराकडे केव्हांही कोणास येऊं देऊं नये. अशी आम्हांस सक्त ताकीद आहे. त्याला आम्हीं तरी काय करावें बरें! कसेंही असो (हळू स्वरानें) आपण लौकर येथून उठा, दरबारच्या डेऱ्याकडे जा पाहिजे तर; उठा हो (काकुळतीनें) जा उठा हो, सरकारची उठण्याची वेळ झाली. अहो उठा. सरकार स्वारी उठून बाहेर आली आणि जर कां आपण येथें दृष्टीस पडलां तर आपल्याला कांहीं म्हणणार नाहींत सरकार, पण आमची मात्र मग भरलीच शंभर वर्षें पहा. अहो उठा! हें पहा!! "धर्म करतां कर्म कसें उभें होतें तें." आतां दया करा महाराज! अहो उठा!

**ब्रा०**—जमादारबावा? रागावूं नका हो. अहो हा राजा अनाथाविषयीं किती म्हणून दयाळू आहे बरें का! तें तुम्हाला कळलें नाहीं अजून! अहो हा कोठेंही असो व कोणतीही कां वेळ असेना! हा गरीब, अनाथ, पंगू अशा लोकांची तो तेव्हांच दाद घेतो. रागावत नाहीं. ह्याचा दाखला कदाचित् तुम्हाला आतांच येईल पहा.

**राजा**—(इतक्यांत जागा होऊन) कायरे, कोण आहे?

**जमादार**—जी, सरकारचा जयजयकार असो. एक अगदीं नग्न झालेला तरी तेजःपुंज असा ब्राह्मण येथें कोणीकडून व केव्हां आणि कसा आला कोण जाणें मी त्याला मघांपासून

पुष्कळ पुष्कळ प्रकारें समजावून सांगितलें कीं आपण दरबाऱ्च्या डेऱ्याजवळ जाऊन बसा, पण तें कांहीं ऐकत नाहीं.

**राजा**—बरें तर येऊंदे त्यांना आंत.

**जमादार**—आज्ञा सरकार, ( ब्राह्मणास हातीं धरून डेऱ्यांत सोडून ) आज्ञेप्रमाणें ब्राह्मण हजर आहे.

**ब्राह्मण**—( ओणव्यानें कांपत कांपत राजास लक्षून )

**श्लोक.**

कदंब करि वाजिचे घरिं झुलोंत हीं सोतते ॥
प्रजाहि बहु प्रीतिनें जनि भजोत राया तुतें ॥
प्रिया सुशिल सुंदरी सुखद जी तुझ्या अंतरीं ॥
रमो तुजसवें सुखें रतिसमा रती मंदिरीं ॥ ९७ ॥

(कांपत कांपत पुढें होऊन श्रीफळ राजापुढें ठेवून दीनमुद्रेनें तसाच उभा रहातो.)

**राजा**—(कांहीं वेळ त्या ब्राह्मणाकडे लक्षपूर्वक पाहून)—

**आर्या.**

आशी ऐकुनि तुमचा दुर्योधन कर्ण तृप्त होतात ॥
अभिमानी छद्मी मी परि गमतां मित्रसे कि प्रिय तात ९८

हे विप्रश्रेष्ठा आपल्या दर्शनानें आज मला संतोष वाटत आहे. असा कधींच वाटला नव्हता. द्विजोतमा आपण जी इच्छा धरून आलां असाल ती प्रदर्शित करावी.

**ब्राह्मण**—राजा, तुझ्या कृपेच्या छायेंत कालक्रमण करीत करीत ह्या वयास येऊन पोंचलों.

राजा— श्लोक.

जगीं सोमवंशीं बहू भूप झाले ॥
प्रतापें बळें भूमि भोगून गेले ॥
तया वंशि बा जन्म तूझेंच राया ॥
उदारा, गमे कूळ तें भूषवाया ॥ ५९ ॥

राजा तूं महापराक्रमी, मोठा दयाळू, अनाथाचा नाथ, तुझ्या आश्रयानें ह्या वार्धक्यावस्थेपावेतों आनंदानें कालक्रमण केलें, आतां अगदीं मरावयास टेकलों; अशा अवस्थेंत भग्नाश रे, मरावें लागणार ! असेंच दिसतें ! राजा येवढाचरे हा दुर्धर प्रसंग ह्या जन्मांत आला आणि तोही ह्मातारपणीं, पण तुझ्या दयालुत्वाच्या कीर्तीनें मला दृष्टांत दिला कीं कुरुपतीच्या दर्शनानें मनोरथ पूर्ण होतील. तेव्हां ह्या स्वप्नाची प्रतीती पहाण्याच्या बुद्धीनें तुझ्या पायांवेरीं आलों आहे. राजा, तुझ्या राज्यांत खुद्द तुझ्या फौजेकडून, तुझें सदां सर्वकाळ अभिष्ट चिंतणारे जे आह्मी ब्राह्मण तशांत तुझ्या वडिलाचें आवडतें श्री गणपतीचें संस्थान, त्या देवाचा मी पुजारी आणि अग्नीहोत्री, अशा अनाथावर कारे विशेषेंकरून जुलुम व्हावा ! हर हर !!! देवा कशीरे आह्मां विप्रांविषयीं ह्या राजाच्या मनांत निष्ठुरता उपजविलीस !! देवा आतां आमची कोणरे दाद घेईल ! (हंबरडा फोडून रडतो.)

राजा—मी मनाचा इतका कठोर ह्मणवितों तरी ह्या ब्रा-

ह्मणाकडे पाहिलें कीं कंठ सद्गदित होऊन येतो हा काय चमत्कार ?

( आलेला गहिंवर सांवरून थोडा वेळ विचार करून )

आर्या.

साळी गोधुमयवही बहु पोषक होति सत्य मनुजास ॥
अनुषंगें त्यांच्या परि कीटक मुकतात फार जीवास ॥ ६० ॥

**ब्राह्मण**—( निमिष मात्र विचार केलासें दाखवून ) सस्मितपणें राजा—

आर्या.

जोंवरि शक्ती शरिरीं तों मन करि फार सौख्य हव्यास ॥
येतां पांचहि दाटुनि विनयें रिझवील काय मुनि व्यास ॥ ६१ ॥

**राजा**—उपमर्द झाला असल्यास क्षमा करा, आणि आपलें काय दुःख असेल तें कळवा.

**ब्राह्मण**—( डोळे व तोंड पुसून. )

आर्या.

कन्यादान फलाची वांच्छा होती परंतु दैवानें ॥
घाला पडून नेली उपवर कन्या तुझ्याच मित्रानें ॥ ६२ ॥
सुगुणी सुरुची बाला आणुनि देई अह्मास भू देवा ॥
बोल किती गोड अहा ! मीनाक्षी पूर्ण गूणरुप ठेवा ॥ ६३ ॥

मीनाक्षी, मीनाक्षी ! कधीग माझ्या दृष्टीस पडशील ! मीनाक्षी ! ! आतां कसची मीनाक्षी माझ्या दृष्टीस पडते ! माशानें माणीक गिळिलेलें ! ( मोठ्यानें रडूं लागतो. )

(आरंभापासून सर्व भाषण मीनाक्षी अंतःपुरच्या डेऱ्यांतल्या महालाच्या पडद्याआड बसली होती तेथून ऐकतच होती; म्हणून शब्दावरून व भाषणाच्या प्रकारावरून तिला आपल्या बापाची ओळख खास पटतांच पडदा सारून बाहेर आली, आणि राजाची कांहींएक भीति न धरितां त्या ब्राह्मणाचे पायांस तिनें घट्ट मिठी मारिली. आणि या प्रसंगीं तिचा कंठ दाटून येऊन तिला जे रडें कोंसळलें ते तिला आंवरेना. तेव्हां त्या ब्राह्मणानें आपल्या हातांनीं धरून मोठ्या प्रयासानें तिची ती मिठी सोडविली. आणि मोठ्या प्रेमानें तिला आलिंगन देऊन आपल्या आनंदाश्रूंनीं त्या ब्राह्मणानें मीनाक्षीचें सर्वांग न्हाणिलें. मीनाक्षीही स्फुंदत स्फुंदत वरचेवर हुंदके देत देत आई, आईग, केव्हांग भेटशील! असें ती म्हणतच आहे व तो ब्राह्मण तिला गोंजारून गोंजारून समजावतोच आहे असें एक घटकाभर पावेतों पाहून.)

**राजा**—(आपल्याशींच) जो पहावा तो अपूर्वचमत्कार! असा कोणी पाहिला नसेल! व ऐकिलाही नसेल! ह्या ब्राह्मणाला मीनाक्षीचें नांव कळलें कसें! बरें त्यानें 'मीनाक्षी' असें उद्गार काढतांच मीनाक्षी इतकी शहाणी, इतकी धूर्त, व मोठी धैर्यवान असतां व मोठी मर्यादशील अशी असतां, व मी सार्वभौम बसलेला असतां माझी भीति न धरतां निःशंकपणें पडद्या बाहेर येऊन त्या ब्राह्मणाच्या पायास बिलगली, एवढ्यावरून ह्या ब्राह्मणाची आणि मीनाक्षीची ओळख चांगली असावी

इतकें मात्र अनुमान होतें. ह्या परती कल्पना देखील करतां येत नाहीं. अं: हातच्या कांकणास आरशा कशाला, ह्या जनरूढ वाक्यास लक्षून क्षणभर स्वस्थ बसून त्यांचें भाषण आणखी थोडा वेळ ऐकलें म्हणजे आपोआप कळेल. (एकाग्र चित्तानें ऐकून) देव माझा साहाय्यकर्ता खरा यांत शंका नाहीं. मीनाक्षीच्या बापाचा शोध करून त्यास घेऊन यावें असें अंगराजास पत्र लिहिलेलें अद्याप त्यांस पोंचलें देखील नसेल तोंच तिचा बाप माझ्यापुढें येऊन उभा राहिला व तो देखील न बोलावतां! तेव्हां ही माझ्या सुखसाहित्यास देवाची अनुकूलताच म्हणूं नये तर काय! मी निश्चींतपणें सुखोपभोग घ्यावा म्हणूनच दैवानें अशी योजना केली म्हणायची. आतां माझे मनोरथ लवकरच पूर्ण होतील. अशा विचारांत राजा आहे तोंच.

**ब्राह्मण**—मोठ्या काकुळतीनें—

**श्लोक.**

अम्हा माय तूं नाथ तूं तात भूपा ॥<br>
कृपाळूपणें कन्यका देयि बापा ॥<br>
करूं दान हीचें सुपात्रीं विधीनें ॥<br>
बहू सौख्य पावूं तुझ्या बा कृपेनें ॥ ६४ ॥

**राजा**—अरे ह्या वृद्धानें प्रथम अगदीं लीनतेनें मला वचनांत गोंवून घेतलें. कर्मधर्म संयोगानें मीनाक्षी त्याच्या नजरेस पडून तीही त्याच्याजवळ गेली, तिला पोटाशीं धरून तो एकीकडे रडतो आहे, आणि आपत्यमोहांत पडून आतां ती

परत मागतो, आणि तेंही हृदयद्रावक भाषणानें तेव्हां त्याचें मन न दुखवितां मीनाक्षी प्राप्त होईल अशी युक्ती योजिली पाहिजे. ( क्षणभर विचार करून ) काय ! मला युक्ति सुचत नाहीं ! ( आणखी थोडा वेळ पावेतों चित्त स्थिर करून )—

आर्या.

आशी लक्षुन मागा सजलों द्याया तुम्हांस मी कामी ॥
दास असे हा मधुचा, मीनाक्षी, भृंग, सत्यकलिका, मी ॥६१॥

**ब्राह्मण**—अँ " आशीलक्षुनमागा " असें कां बरें म्हणाला ? ( थोडा वेळ विचार करून ) हँ हँ शाबास राजा, तुझें चातुर्य पाहून संतोष वाटला. येथें तूं मला कुंठित केलेंस. रे ह्या मुलीच्या जन्मापासून पहातों तों असेच चमत्कार होत आले. " मनसा चिंतयेत् कार्यं दैवं अन्यत्र चिंतयेत् " भवितव्य तें कधींही टळावयाचें नाहीं, असें वाडवडील म्हणत आले तें कसें खोटें होईल ! गतगोष्टीवरून आतां मला असें वाटतें—

श्लोक.

सहज घडून गांठी प्रेम हा लाभ मोठा ॥
अघटित घटनेनें वाटतें रत्नपोटा ॥
निपजत पितरांतें कौतुका दावण्याला ॥
रचुनि विभु विधीनें शाप निर्माण केला ॥ ६६ ॥

प्रस्तुत सुख इतकेंच मानण्याचें कीं मुलीचे गुण तुला आवडले; मुख्य मला जें काय पहावयाचें होतें तें येवढेंच. आतां ह्या मुलीस तुला देण्याचें ना म्हणतां नये. कारण आमचा मा-

यबाप तूंच, तुझ्या इच्छेविरुद्ध आह्मी वागतां कामा नये हें मनांत आणून सांगतों कीं, तूं हिचें पाणिग्रहण कर.

**राजा**—( सुप्रसन्न मुद्रेनें ) आपली ब्राह्मणाची आज्ञा आम्हां क्षत्रियांस उल्लंघितां कामा नये. उभयपक्षींची तयारी करवितों. सुमुहूर्ताची योजना होऊन आज्ञा व्हावी.

**ब्राह्मण**—मुहूर्त तो काय पाहावयाचा ! मनमुहूर्तासारखा मुहूर्त नाहीं. आतां जनचालीप्रमाणें पहातां आजच गोरज उत्तम मुहूर्त आहे असें मी ऐकलें आहे. तयारी बियारी काय करविण्याची असेल तर, तूं करीव तुला हवी असेल तशी. तो खटाटोप आम्हा भिक्षुकांस कशाला ! मुलीला मंगलस्नान वेदोक्त मार्गाप्रमाणें घालून मुलीचे अंगास हळदीचें बोट फांसावें आणि नारळ व मुलगी यथाविधी वराचे हवालीं करून त्याच्या हातावर उदक घातलें म्हणजे आलें सर्व त्यांत.

**राजा**—जशी आपली मर्जी असेल तसेंच मला मान्य.

**ब्राह्मण**—तर मग आतां अवकाश फार नसेलसें दिनमानच सांगतें. ह्या गांवच्या पूर्वेस धर्मशाळा आहे तेथें मी उतरलों आहें. माझें नांव विश्वंबरभट्ट हरीपूरकर, समजलासना ! नीट ऐकून घे आतां मी काय सांगतों तें. मी त्या धर्मशाळेंत जातों तेथें मीनाक्षीला मजजवळ पोंचती करीव. ( मीनाक्षीचे कानीं लागून निघून जातो. )

**राजा**—कोण आहे रे ! जा मामास हांक मार.

**कंचुकी**—जी, सरकार. ( कांहीं वेळानें परत येऊन ) मामासाहेबाची स्वारी हजर आहे.

**शकुनी**—( महालांत प्रवेश करून ) राजा तुझा विजय असो.

**राजा**—अहो मामा! आतां जो ब्राह्मण आला होता तो काय बोलून गेला वगैरे तुम्हाला कांहीं कळलें कां?

**शकुनी**—हो, बहुतेक कळलें. पण तो ज्या अर्थी अगदीं गरीब आहे, त्या अर्थी त्याचेकडून कोणत्याही प्रकारची व्यवस्थितपणाची तजवीज रहाण्याची मुषकीलच. ती सर्व आपलेकडूनच आपण ठेवविली पाहिजे.

**राजा**—हें काय हो! तें तर उघडच आहे; पण तुम्ही ह्याची योजना केलींत का कांहीं तरीं?

**शकुनी**—राजा हें काय विचारतोस बरें, वाकनीस, पोतनीस, जामदार आदिकरून मुत्सद्दी तिकडे सर्व व्यवस्था ठेवण्यास पाठविले आहेत.

**राजा**—कांहो मामा, हस्तनापूर सोडल्यास किती काळ झाला असावा बरें?

**शकुनी**—आज वैशाख शुद्ध १५ ना! हो बरोबर आज एक महिना झाला.

**राजा**—काय! अहो एक का! मला तर नुकते निघालों-सें वाटतें.

**शकुनी**—ह्या वेळीं मुहूर्त अस्मादिकांनीं पसंत केलेला

होता. पहा एकेक अनुकूळ गोष्ट कशी जमत जात आहे ती. ( मीनाक्षीचे महालाकडे बोट दाखवून ) एक तर हें रत्न लाभलें, आणि सर्वांत मोठी गोष्ट आपला मुख्य हेतु सिद्धीस गेल्याचें कळलें. हा केवढा लाभ बरें!

**कंचुकी**—सरकारचा विजय असो, वांकनीस हजर झाले आहेत.

**शकुनी**—कां जामदार सर्व व्यवस्था जिथल्या तेथें लावलीतना?

**जामदार**—जी, मी शेवेस हजर झालों आहे. ( शकुनीचे कानीं लागतो. )

**शकुनी**—ही एक मोठी अचंब्याचीच गोष्ट.

**राजा**—कांहो, अचंबा वाटण्याजोगी काय गोष्ट झाली.

**शकुनी**—त्या धर्मशाळेपाशीं गवंडी, सुतार, पाथरवट, लोहार, जिनगर वगैरे शेंकडों कारागीर आपापल्या कामांत अगर्दी गर्क आहेत आमच्याकडून तिकडे गेलेल्या माणसांशीं त्यांपैकीं कोणी भाषण करीत नाहीं इतकेंच नाहीं तर आमच्या माणसांकडे ते पहात देखील नाहींत! अशा लगबगीनें कामें चाललीं आहेत, व बहुतेक ठिकाणचीं कामें आटोपलीं व कांहीं नवीं सुरू झालीं आहेत. त्या ठिकाणीं कारागिरांची तर आहेच पण प्रेक्षकांची ही दाटी मनस्वी. तशांत शिरून वांकनीस वगैरेनीं जातीनें तपासून पाहिलें पण तेथें म्हातारा मनुष्यच नाहीं. जे आहेत ते ऐन पंचविशींतलें तिशींतलें जानजवान धिप्पाड, बांधेसुद व सुरेख असेच लोक आहे! मग तेथें विचारावें को-

णाला आणि पुसावें काय? कोणाची कोणी दाद घेत नाहीं, कीं, कोणाला कशाची ददात नाहीं. म्हणून पाठवलेलीं सर्व माणसें जशाचीं तशीं परत आलीं.

**राजा**—अहो! तो येवढा तेजस्वी ब्राह्मण आपलें नांव गांव सुद्धां सांगून गेला. कितीही गर्दी असली तरी झांकला जाण्याजोगा नसतां तुम्हीं पाठवलेलीं माणसें असें रडगाणें गात परत आलीना! ठीकच आहे. तुमच्या दिमतींतलींच तीं मग अशीं परत आलीं ह्यांत आश्चर्य तें कोणतें!!! कंचुकी हूं.

**कंचुकी**—आज्ञा सरकार, सरकारचा विजय असो, असें म्हणून निघून जातो.

**राजा**—कां मामा तुमच्या चातुर्याचें जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच. वांकनीस वगैरेस तुम्हीं काय सांगितलेंत ते बोला पाहूं.

**शकुनी**—मीनाक्षीचे आईबाप त्या धर्मशाळेंत उतरले आहेत त्यांजकडे जाऊन त्यांस काय काय व किती किती आणि कसकशा तऱ्हांच्या वस्तु पाहिजेत हें त्यांस पुसा आणि तितक्याही सर्व नीट व्यवस्थितपणानें व हुशार माणसांसह जेथल्या तेथें प्रसंगास बिनबोभाट उपयोगीं पडतील अशी तजवीज ठेवा म्हणून ताकीद केली होती. मी आपल्या मतें कांहीं एक चुकलों नाहींसें वाटतें.

**राजा**—मग ठीकच झालें, 'अहो मीनाक्षीचे आईबाप' हा पत्ता का? त्यांचें नांवगांव नको का सांगायला? काम क-

रायचें तें असें; आणि जेथें तेथें तुम्हीं आपल्या हुशारीची प्रौढी मारित असतां.

**कंचुकी**—( मोठ्या हर्षानें ) सरकारचा जयजयकार असो. सरकार मी तेथें जाऊन पाहूं लागलों तों, कारागीर लोकांची कामें तमाम आटोपलीं आहेत. त्या विस्तीर्ण मैदानाभोंवतीं भरगच्ची कनाथी लागून गेल्या आहेत. ज्या मंडपाखालून मी धर्मशाळेच्या आंतल्या चौकांत गेलों तो मंडप कसा आहे तें ऐका सरकार—

## कटाव.

राजेंद्रा त्या मंडपाची अद्भुत कीं शोभा दिसती; झाला सुंदर सायंकाळ ॥ वारा वाहतसे झुळझूळ ॥ मंदसुगंध आणि शीतळ ॥ त्याचा चाले स्वनमंजूळ ॥ चाल ॥ भरगच्ची ती कनाथ भोंवतीं मध्यें मध्यें बहु पद्धत पंगती ॥ संगमरवरी ॥ सफेत जांभळ्या तशा शेंदरी ॥ लाल पींवळ्या कितिक, केशरी ॥ प्रस्तरदुस्तर, जोडियले ते बहू कूसरी ॥ चौक साधिले, तऱ्हेतऱ्हेचे ॥ कलमदानी तसेच असती, बहुत बदामी ॥ जागोजागीं बूट खोदिले ॥ चोहों बाजुनीं वेल चढविले ॥ नानापरिचे ॥ सुरम्यसाचे ॥ जातिकुसुमचे ॥ अनेक असती मोगरियाचे ॥ गजवयशी वाट रुंदिची ॥ प्रशस्तसाची ॥ दोहों बाजुंनीं समांतरानें॥ गोपूराकृति ॥ उंच कठाडे ॥ बहूत गाढे ॥ छातिबरोबर ॥ सवेच त्यांच्या बहुत मनोहर ॥ स्तंभावरतीं ॥ दीप शोभती ॥ नृपाकारणें स्वागत कथिती ॥ निकटखरे ॥ तरि सूक्ष्म अंतरें ॥

वृक्ष सुरूचे ॥ सुरम्यसाचे ॥ वरती मंडप घोस द्राक्षांचे ॥ घनदाट असती ॥ राजेंद्रा० ॥

अशा मंडपाखालून धर्मशाळेंत जाऊन बघतों तों जे विश्वं-बरमहाराज येथें आले होते तेच बहुतकरून व पुढें त्यांच्याशीं माझें भाषण झालें त्यावरून खास तेच तेथें आहेत. पण येवढ्या गर्दीत ते महाराज मला असे दिसले.

### श्लोक.

बाळां तात, महाजनां, धनदसा, त्राता अनाथां तसा ॥
तेजें भास्करसा अनंत बळसा दुष्टांसकीं काळसा ॥
रूपें जो सरसा स्त्रियां मदनसा मोही जना फारसा ॥
ऐसा विप्रकरीं प्रदोषसमयीं पूजाविधि फारसा ॥ ६७ ॥

इतका काय तो मात्र फरक—आणखी त्यांची स्त्री तेथें ज-वळच होती, त्या बाईसाहेब तरी—

### श्लोक.

रूपें एशी ( मीनाक्षीच्या महालाकडे बोट दाखवून ) सुढळ सुव्रता मूर्त ती देवमाता ॥
बोले जैशी सदय हृदया माय भासे अनाथा ॥
वात्सल्यानें सुमन भजकां भासत्ये अंबिका कीं ॥
वाटे आली अमित चरितें दावण्या मर्त्यलोकीं ॥ ६८ ॥

अशी ती बाई आहे. पुढें त्या महाराजांशीं माझें भाषण झालें. व त्यांनीं, ते येथें आले होते त्या वेळेस येथें ठरलेल्या प्रत्येक गोष्टीची, मला ओळख देऊन “ मीनाक्षीस राजानें अ-

द्याप कां पाठविलें नाहीं" असें विचारलें. तेव्हां मी गप्प राहि लों. ह्यावरून त्यांनीं सर्व ताडलें, आणि बाईसाहेबांस घेऊ जाण्यासाठीं आपले दोन शिष्य मजबरोबर पाठविले आहेत व सरकार स्वारीस निमंत्रणार्थ त्या महाराजांच्या पदरचे स दारही तयारींतच होते. मी गेलों त्या वेळीं मंडपाचे मध्यभाग कांहींएक नव्हतें, पण विश्वंभर महाराजांचा निरोप घेऊन नि घालों आणि येतांना पाहिलें तों मंडपाचे मध्यभागीं.

श्लोक.

कारंजीं सुटती तुषार उडती हंसास पाचारिती ॥
हौदा माजि सुरम्य पुष्कर लता पुष्पी तशा शोभती ॥
बैसोनि वरती मधूकरतती गुंजारवातें करी ॥
केकी नाचति ते मराळ ततिही केली जळीं त्या करी॥१९

**वि० शिष्य**—राजा विजय असो, लग्न वेळेला अवका थोडा राहिला. आमच्या मीनाक्षी ताईस अद्याप कां पाठवि नाहीं म्हणोन गुरुजींनीं विचारलें आहे.

**राजा**—कां मामा ( ह्या विश्वंभर भट्टजीच्या विद्यार्थ्यांक बोट दाखवून ) हें काय विचारतात.

**शकुनी**—ही सर्व तयारी झालीच अवकाश कसचा

**कंचुकी**—सरकारचा विजय असो, विश्वंभर महाराजांकडू न पाचारण आलें आहे.

**राजा**—मामा सर्व बंदोबस्त ठेवून निघण्याची तयारी कर वून कळवा.

वृक्ष सुरूचे ॥ सुरम्यसाचे ॥ वरती मंडप घोस द्राक्षांचे ॥ घनदाट असती ॥ राजेंद्रा० ॥

अशा मंडपाखालून धर्मशाळेंत जाऊन बघतों तों जे विश्वंबरमहाराज येथें आले होते तेच बहुतकरून व पुढें त्यांच्याशीं माझें भाषण झालें त्यावरून खास तेच तेथें आहेत. पण येवढ्या गर्दींत ते महाराज मला असे दिसले.

श्लोक.

बाळां तात, महाजनां, धनदसा, त्राता अनाथां तसा ॥
तेजें भास्करसा अनंत बळसा दुष्टांसकीं काळसा ॥
रूपें जो सरसा स्त्रियां मदनसा मोही जना फारसा ॥
ऐसा विप्रकरीं प्रदोषसमयीं पूजाविधि फारसा ॥ ६७ ॥

इतका काय तो मात्र फरक—आणखी त्यांची स्त्री तेथें जवळच होती, त्या बाईसाहेब तरी—

श्लोक.

रूपें एशी ( मीनाक्षीच्या महालाकडे बोट दाखवून ) सुढळ सुव्रता मूर्त ती देवमाता ॥
बोले जैशी सदय हृदया माय भासे अनाथा ॥
वात्सल्यानें सुमन भजकां भासत्ये अंबिका कीं ॥
वाटे आली अमित चरितें दावण्या मर्त्यलोकीं ॥ ६८ ॥

अशी ती बाई आहे. पुढें त्या महाराजांशीं माझें भाषण झालें. व त्यांनीं, ते येथें आले होते त्या वेळेस येथें ठरलेल्या प्रत्येक गोष्टीची, मला ओळख देऊन “ मीनाक्षीस राजानें अ-

द्याप कां पाठविलें नाहीं" असें विचारलें. तेव्हां मी गप्प राहिलों. ह्यावरून त्यांनीं सर्व ताडलें, आणि बाईसाहेबांस घेऊन जाण्यासाठीं आपले दोन शिष्य मजबरोबर पाठविले आहेत. व सरकार स्वारीस निमंत्रणार्थ त्या महाराजांच्या पदरचे सरदारही तयारींतच होते. मी गेलों त्या वेळीं मंडपाचे मध्यभागीं कांहींएक नव्हतें, पण विश्वंभर महाराजांचा निरोप घेऊन निघालों आणि येतांना पाहिलें तों मंडपाचे मध्यभागीं.

श्लोक.

कारंजीं सुटती तुषार उडती हंसास पाचारिती ॥
हौदा माजि सुरम्य पुष्कर लता पुष्पी तशा शोभती ॥
बैसोनि वरती मधूकरतती गुंजारवातें करी ॥
केकी नाचति ते मराळ ततिही केली जळीं त्या करी॥६९॥

**वि० शिष्य**—राजा विजय असो, लग्न वेळेला अवकाश थोडा राहिला. आमच्या मीनाक्षी ताईस अद्याप कां पाठविलें नाहीं म्हणोन गुरुजींनीं विचारलें आहे.

**राजा**—कां मामा ( ह्या विश्वंभर भट्टजीच्या विद्यार्थ्यांकडे बोट दाखवून ) हें काय विचारतात.

**शकुनी**—ही सर्व तयारी झालीच अवकाश कसचा

**कंचुकी**—सरकारचा विजय असो, विश्वंभर महाराजांकडून पाचारण आलें आहे.

**राजा**—मामा सर्व बंदोबस्त ठेवून निघण्याची तयारी करवून कळवा.

**कर्ण**—कां मामा, काल राजाचे स्वशुरांनीं कशी काय पा-उवणी केली ?

**शकुनी**—काय सांगावें अंगराजा! अहो पहिल्यानें त्या ावाची चर्या पाहिली तेव्हां तो अगदीं दरिद्रीचसा दिसला. ण कालच्या तेथल्या थाटावरून त्याच्या ऐश्वर्याचा कोणास ांगच लागणार नाहीं असें वाटतें. मी तर तें पाहून अगदीं क झालों!!!

**कर्ण**—राजाची प्रफुल्लित मुद्रा पाहून—हंसत हंसत—राजास देशून.

श्लोक.

केली करीत असतां रति मंजिरीशीं ॥
माझी तुला स्मृति अशा समयींच कैची ॥
कांहीं गमे जरी उणें तरि ह्या जनाला ॥
आज्ञा करीं पुरवितों तंव कामनेला ॥

**राजा**—मित्रा तुजसारखा सुखदाता असतां मला काय उ-णडणार! तरी—

श्लोक.

कांहीं न्यून नसे तरीं मज सख्या वाटे बहू खेद कीं ॥
तुझ्या शौर्यबळें मला सुख तसें तूतें असेनांच कीं ॥
दैवें होउनि सानुकूल, समयीं ( चंद्रप्रभेकडे बोट करून )
ही प्रेषिली सुप्रिया ॥
ीनाक्षीच दुजी तुझ्याविण दुजा जोडा न रूपास या ॥

हिचा आपण अंगिकार करावा अशी माझी इच्छा आहे.

**कर्ण**—राजा, आपण असें म्हणतां पण थोडा विचार केला तर हें आपलें म्हणणें व करणें रास्त नाहीं. असें आपणांसच वाटेल.

**राजा**—मी विचार पाहूनच आपणांस शब्द टाकिला आहे.

**कर्ण**—आपणांस सर्व कांहीं कळत असतां प्रस्तूत आपलें प्रेम मजवर विशेष असल्यामुळेंच आपण अशी गोष्ट मनांत आणतां पण वस्तुतः हा अन्याय आहे.

**राजा**—आपणास हें माझें म्हणणें अन्यायाचें कां वाटलें बरें ? स्पष्ट कां बोलाना.

**कर्ण**—अहो तुमच्या गुरुपुत्रानें तुम्हाला म्हणून जी वस्तु आणून दिली ती आपण त्याचे समक्ष मला देऊं इच्छिता ह्यांत त्या गुरुपुत्राचा अपमान नाहीं का ? तो तरी अगदीं यःकःश्चितांतला नाहीं कांहीं.

**राजा**—माझ्या समजुतीप्रमाणें या माझ्या करण्यांत त्याची मानहानी मुळींच नाहीं. लुटींत ज्या ज्या वस्तु आणिल्या त्या सर्व सरकारांत दाखल कराव्या, हें राजनीतीप्रमाणें योग्य, तसें त्यानें केलें. त्यानंतर त्या सर्व वस्तूंवर स्वामित्व माझें झालें; म्हणून त्याचा विनियोग मी आपल्या मर्जीप्रमाणें करणार ह्यांत अन्याय तो कोणता ? कांहींच नाहीं. शिवाय, अंगराजा ?

**श्लोक.**

सुरस रुचिर अन्नें तोष रुग्णा न देती ॥

**कर्ण**—कां मामा, काल राजाचे स्वशुरांनीं कशी काय पा-
उवणी केली ?

**शकुनी**—काय सांगावें अंगराजा ! अहो पहिल्यानें त्या
बावाची चर्या पाहिली तेव्हां तो अगदीं दरिद्रीचसा दिसला.
पण कालच्या तेथल्या थाटावरून त्याच्या ऐश्वर्याचा कोणास
थांगच लागणार नाहीं असें वाटतें. मी तर तें पाहून अगदीं
थक्क झालों ! ! !

**कर्ण**—राजाची प्रफुल्लित मुद्रा पाहून—हंसत हंसत—राजास
उद्देशून.

श्लोक.

केली करीत असतां रति मंजिरीशीं ॥
माझी तुला स्मृति अशा समयींच कैची ॥
कांहीं गमे जरी उणें तरि ह्या जनाला ॥
आज्ञा करीं पुरवितों तंव कामनेला ॥

**राजा**—मित्रा तुजसारखा सुखदाता असतां मला काय उ-
णं पडणार ! तरी—

श्लोक.

कांहीं न्यून नसे तरीं मज सख्या वाटे बहू खेद कीं ॥
तूझ्या शौर्यबळें मला सुख तसें तूतें असेनांच कीं ॥
दैवें होउनि सानुकूल, समयीं ( चंद्रप्रभेकडे बोट करून )
ही प्रेषिली सुप्रिया ॥
मीनाक्षीच दुजी तुझ्याविण दुजा जोडा न रूपास या ॥

हिचा आपण अंगिकार करावा अशी माझी इच्छा आहे.

**कर्ण**—राजा, आपण असें म्हणतां पण थोडा विचार केला तर हें आपलें म्हणणें व करणें रास्त नाहीं. असें आपणांसच वाटेल.

**राजा**—मी विचार पाहूनच आपणांस शब्द टाकिला आहे.

**कर्ण**—आपणांस सर्व कांहीं कळत असतां प्रस्तूत आपलें प्रेम मजवर विशेष असल्यामुळेंच आपण अशी गोष्ट मनांत आणतां पण वस्तुतः हा अन्याय आहे.

**राजा**—आपणास हें माझें म्हणणें अन्यायाचें कां वाटलें बरें ? स्पष्ट कां बोलाना.

**कर्ण**—अहो तुमच्या गुरुपुत्रानें तुम्हाला म्हणून जी वस्तु आणून दिली ती आपण त्याचे समक्ष मला देऊं इच्छिता ह्यांत त्या गुरुपुत्राचा अपमान नाहीं का ? तो तरी अगदीं यःकश्चितांतला नाहीं कांहीं.

**राजा**—माझ्या समजुतीप्रमाणें या माझ्या करण्यांत त्याची मानहानी मुळींच नाहीं. लुटींत ज्या ज्या वस्तु आणिल्या त्या सर्व सरकारांत दाखल कराव्या, हें राजनीतीप्रमाणें योग्य, तसें त्यानें केलें. त्यानंतर त्या सर्व वस्तूंवर स्वामित्व माझें झालें; म्हणून त्याचा विनियोग मी आपल्या मर्जीप्रमाणें करणार ह्यांत अन्याय तो कोणता ? कांहींच नाहीं. शिवाय, अंगराजा ?

**श्लोक.**

सुरस रुचिर अन्नें तोष रुग्णा न देती ॥

सकल सुखद वस्तू तेवि मातेंच होती ॥
मजसम तुजला बा सौख्य होई प्रियेचें ॥
तंवरि मज गमेना सौख्य हें सौख्य साचें ॥

**कर्ण**—असेंच खरोखर असेल तर.

### आर्या.

जेणें तोष तुला तें आहे कर्तव्य सत्य जानं मजला ॥
दधिसार वंचुनीबा ! सूज्ञ करीना कधींच आ तेला ॥

(याप्रमाणें कर्णाचें भाषण ऐकतांच राजास संतोष वाटला आणि राजानें मोठ्या समारंभानें पुष्कळ प्रकारच्या उपभोग्य वस्तूंसह चंद्रप्रभा अंगराजास अर्पण केली. आणि त्या उभयतांस राजानें नानाविध वस्त्रालंकारांनीं गौरविलें. कर्णही राजाचे आभार प्रदर्शीत करून चंद्रप्रभेसह आपल्या शिबिरास गेला. राजा आपल्या महालीं गेला. )

## पहिला अंक समाप्त.



# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ—वृकप्रस्थ—दरबारचा डेरा.**

( इंद्रप्रस्थ सर करून आणलेल्या लुटीपैकीं शिल्लक राहिल्या लुटीची मोजदात करून ती हस्तनापुरास रवाना करण्याची तजवीज चालली असतां पडद्यांत ) अहो माझी कोणी दरबारांत दाद लावतो का ! मी उमाशींतापाशीं केव्हांचा किळकिळ्या देत दारापाशीं तिष्ठत बसलों आहें.

**भालदार**—महाराजांचा जयजयकार असो. कोणी जटा व दाढी वाढविलेला पण तेजस्वी ब्राह्मण सरकारची भेट घेण्याचें इच्छितो आहे.

**शकुनी**—( राजाचे कानीं लागून ) येऊं दे, त्याला आंत.

**विश्वंभर ब्राह्मण**—( सभेंत प्रवेश करून चोंहींकडे न्याहाळून पाहून—

**श्लोक.**

हे राजा तव कामना सकलही जावोत सिद्धीप्रती ॥
जिंकोनी मणिपूर योधवर तूं धाशील रे निश्चितीं ॥
पावोनीं विजया सुखें स्वसदना ईशकृपें येशिरे ॥
आनंदें गरिबांस तृप्त करि तूं देवून द्रव्यें करें ॥ १ ॥

(असा आशीर्वाद देऊन, रक्तचंदनलिप्तदूर्वा व श्रीफल राजापुढें ठेवून परत येऊन, आपल्या जाग्यावर उभा रहातो. )

**शकुनी**—भट्टजीबावा, आपलें आगमन कोणी कडून झालें, व काय इच्छा असेल ती राजास कळवा.

**विश्वंभर ब्रा०**—शकुने, ब्राह्मणाचा कळवळा सोमवंशांतील नृपांस येतो तसा दुसऱ्यांस येणारे राजे ह्या भूमंडळावर फारच विरळा, आणि सांप्रत ह्या राजाजवळ तूं कारभारी आहेस, म्हणून आम्हा ब्राह्मणांची कांहींशीं ठाकुरकी बरीच रहाण्याची आशा; नाहींतर आमची फार विटंबना झाली असती. पण आमच्या दुर्दैवाचा पगडा सांप्रतकाळीं राष्ट्रावर एवढा जबर बसला आहे कीं, असा प्रतापी भूप, आमचें दुःख निवारण करण्याविषयीं, मोठा दक्ष असतांही, ह्या राजदरबारचे आश्रित व राजहस्तकही आम्हां हतभाग्य लोकांस विनाकारण ताप देतात. ही गांजणूक आम्हीं सोसावी तरी कोठवर ! (रडूं लागतो)

**शकुनी**—आपण इतका खेद करूं नका; काय दुःख असेल तें सर्व सरकारचे कानांवर निःशंकपणें घाला.

**वि० ब्रा०**—काय सांगूं शकुने, हा राजा आमचें संरक्षणार्थ इतका दक्ष असतांही, त्या दुष्ट मांडलिकानें, आपल्या गणेशपूरच्या देवस्थानावर घाला घालून सर्वस्व रे हरण करून नेलें. अरे मी, त्या देवाचा पुजारी, म्हणून विशेषेंकरून मला त्यानें फार छळलें; त्याचे अनुयाई, केवळ यमदूतच, त्यांनीं माझा छळ जो मांडला होता त्याचे कोणकोणते प्रकार मी सांगूं आतां !

अरे, मी तुमच्या देवस्थानाचा पुजारी ब्राह्मण, तशांत अग्निहोत्री, पण तें दुष्ट निर्दयी, थोडें वचकले देखीलरे नाहींत; त्यांच्या अनन्वित कर्मांचा प्रकार केवढा घोर पहा ! त्या पाषाण हृदयांनीं माझी सुशील, सदाचार संपन्न, रूपवती, उपवर झालेली कन्या, माझ्या कुटुंबांतील प्रत्येक माणसास, ती प्राणापरीस प्रिय, जिला, मी तळहातावरच्या फोडाप्रमाणें वागवीत होतों, व जिच्या विवाहाच्या योजनेंत मीं होतों, अशा माझ्या प्रियकर कन्येस कीं हो त्या दुष्टानें नेलें. पण अशा दुःखांत मी सुख इतकेंच मानितों कीं, त्या माझ्या कन्येस कौरवेश्वरानें सांप्रत आपल्या आश्रयास ठेविलें आहे असें मला कळलें आहे. अस्तु, जें जें लिहिलें असेल भाळीं तें तें न चुके कदा काळीं ' पण प्रस्तुत माझी राजास येवढीच विज्ञाप्ति आहे कीं, तेवढी माझी कन्या मला परत द्या, म्हणजे सुमुहूर्तावर तिचें योग्यपात्रीं, मी यथाविधि दान करीन.

**शकुनी**—आपली ही गोष्ट ऐकून मलाही दुःख वाटतें. तसाच, राजानें तिला आपले आश्रयास ठेविली आहे म्हणतां, त्याबद्दल अचंबा वाटतो; कारण, राजाचे आश्रयास अष्टोप्रहर असणारांसही ही गोष्ट माहीत नाहीं, आणि आपण भरदरबारांत ती गोष्ट निःशंकपणानें बोलतां, ह्याचें नवल वाटतें. तरी मी खातीनें तुम्हांला सांगतों कीं, राजाचे आश्रयास कोणाचीही कन्या नाहीं. तुम्ही आपल्या कन्येचें रूपलक्षण सांगितलेंत,

तसें नांवही सांगा, म्हणजे कोणी नेली असल्यास तपास करविण्यास बरें पडेल.

**विश्वंभर ब्रा०**—शकुने, अशा उडवाउडवीच्या भाषणानें मला नकोरे विशेष दुःख देऊं! जें तुझें भाषण मीं आतां ऐकलें, तें, दुःखावर आणखी डाग दिल्याप्रमाणें माझ्या मनास झोंबलें ( थोडें दरडावून ) समजलास शकुने? मी पुन्हा सांगतों, ऐक नीट. माझी कन्या ह्या राजाचे आश्रयासच आहे. तिचें नांव तुला कळायला पाहिजे म्हणतोस तर ऐक.

## आर्या.

मीनाक्षिचा पिता मी, दुःखार्ती विनवितों, तुम्हां, सदयां ॥
मीनाक्षी द्या परती, ह्या दीनावर तुम्हीं, करून दया ॥ २ ॥

**शकुनी**—( राजाकडे पाहून व ह्या ब्राह्मणास लक्षून थट्टेनें ) हॉः हॉः हॉः भट्टजीबावा? मीनाक्षीबाई आतां कुमारिका नाहीं म्हणजे कौमार्यावस्थेंत नाहीं. हें त्या बाईच्या बापास पूर्णपणें माहीत असलेंच पाहिजे, पण तें कांहीं एक मनांत न आणितां आपण तिचे तात, हें नातें दाखवून त्या बाईस घेऊन जाऊं पहातां, ह्या तुमच्या चातुर्याचें, तसेंच हिमतीचें मोठें नवल वाटतें. अहो मीनाक्षीबाईचें, तिच्या बापानें, राजाशीं लग्न लावून दिलें, ही गोष्ट, ह्या सर्व दुनियेला विदित आहे. आणि ज्या अर्थी आपण येऊन म्हणतां कीं माझी कन्या मला परत द्या, तिचें लग्न करावयाचें आहे. त्या अर्थी तुम्हीं कोणी तरी कपटी पुरुष, ब्राह्मणाचें रूप धारण करून मीनाक्षीस, हरण करून, नेण्याचे

बुद्धीनें आलेले आहां; अगर मीनाक्षीचे तातच असाल तर तुम्ही देहभानावर नाहीं असे म्हणणें भाग पडतें.

**ब्राह्मण**—शकुने साहजिक भाषणांत देखील विनोद करावा असा तुझा स्वभाव असावा असें वाटतें. असे पुरूष राजाश्रित असतात व राजांचीही अशा लोकांवर कृपाच असते तशी ह्या भूपतिची तुजवर कृपा आहे. हें पाहून संतोष वाटतो. पण आम्हा तापशांनां जसें बोलावें तसेंच वागण्यापासून जसा संतोष वाटतो तसा दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें आनंद वाटत नाहीं. आतां तुला विनंती इतकीच आहे कीं ती माझी कन्या मला देवीव.

**शकुनी**—भट्टजीबावा आपण मीनाक्षीचें यथाविधि राजाचे हातावर उदक घातलेंत आणि आतां पुन्हा कन्या परत द्या म्हणतां हें कसें बरें! ह्या तुमच्या भोळसरपणास काय म्हणावें! मीनाक्षी व्यतिरिक्त कांहीं धन मागाल तर पहातां येईल; आतां मीनाक्षीस मागणें हा केवळ तुमचा वेडेपणा आहे.

**ब्राह्मण**—( रागावून ) अरे शकुने, ( हात चोळीत व दांत खात ) त्या कोळ्याच्या फौजेनें छापा घालून मीनाक्षीला नेलें त्या दिवसापासून आज पाऊण महिना होत आला, मी तुमच्या लष्कराच्या मागोमाग उपाशींतापाशीं उन्हातानांतून धांवतां धांवतां आज कुठें राजाची व माझी गांठ पडते आहे. मग मीरे कोठचा आलों तुझ्या राजाच्या हातावर उदक घालायला, आणि कन्यादान करायला? आम्हा तापशांशीं अशी

ढंगांचीं बोलणीं बोलून आम्हांस ताप देऊं नको, म्हणून प्रथमत्त तुझी कान उघाडणी केली, आणि वरचेवर तुम्हीं आपली चाल सोडावी, म्हणून बजावतोंही आहे; तरी तुमच्या डोळ्यावरचें पडळ नाहीं अजून गेलें ऑ: !! इतकें बोलून स्तब्ध होतो. ( इतक्या अवसरांत त्याच्या शरीरांत कोप संचरून त्याची मुद्रा उग्र दिसूं लागली. व त्याच्या कानाच्या पाळी व अधरोष्ठ हीं स्फुरूं लागलीं.

**शकुनी**—मी जें बोललों ह्यांत विनोद काय केला व ढंग कोणते आपणास वाटले तें न कळे. अहो जी गोष्ट खरोखर घडली, ज्या समारंभास हजारों माणसें आलीं होतीं. व हजारों रुपये खर्च झाले, ती बोलण्यांत कशाचा विनोद !"

**वि० ब्रा०**—( क्रोध सांवरून ) रे, हजारों रुपये खर्च झाले म्हणतोस तर ऐक.

## आर्या.

माझी दया नये तरि घ्या, खंड, तुम्हास सत्य ओपीन ॥
तेंही मान्य नसे तरि, द्या, कन्या, ईश्वरास लक्षून ॥ ३ ॥

**शकुनी**—आपण विनाकारण संतापणें आपणास योग्य नाहीं. आपण खंड घ्या. कीं कांहीं करा, मीनाक्षी आपणास परत मिळणें दुरापस्त दिसतें. आतां जें मी बोललों तें तुम्हास न रुचेल, तर राजाही समक्षच आहे, काय आज्ञा करणें असेल ती करील.

**वि० ब्रा०**—राजा ! तुला कांहीं तरी ब्राह्मणाची दया

येईल कां ! ( इतकें बोलून स्तब्ध रहातो, व त्याचे मुद्रेवरून त्या ब्राह्मणाचें पित्त खवळलेंसें दिसूं लागल्या वरून, सभासद, आपआपणांत कुजबुजूं लागले. ( थोडच्याच वेळानें )

**सर्व सभासद**—हा ब्राह्मण मोठा तपस्वी दिसतो. याचें, पूज्य बुद्धीनें महाराजांनीं सांत्वन करणें हेंच कल्याणकारक दिसतें; अतएव त्यास संतोषवून व गौरवून बिदा करण्याची तजवीज मर्जीनुरूप व्हावी. ( शकुनी राजाचे कानीं लागतो. )

**राजा**—आतां सर्वांनीं सूचना केली तसेंच करणें रास्त खरें, पण हा भट्ट व्यवहारज्ञानशून्य, हेकड दिसतो, म्हणून ( शहाण्यास शेव आणि मूर्खास टोणपा ) ह्या न्यायानुरूप ह्याची पूजा स्वतः मीच करणें योग्यसें भासतें. इतकें बोलून त्या ब्राह्मणास लक्षून. रे विप्राधमा.

## आर्या.

व्हावा प्राण तुझा तुज, तरि सत्वर जा, निघोन येथून ॥
भूपें वरिलें जें धन, रे मूर्खा, तें, न माग परतून ॥ ४ ॥
दूर्वा भूषित फेंटा बांधुनि बहुसाळ काय मिरवीशी ॥
मीना तुझ्या मि देवा, तो भीतों काय, याच दंभाशीं ॥५॥
रुदनें, कनकें, स्तुतिनें, वळवाया व्यर्थ कां पहातोसी ॥
रे, याज्ञिका, समज तूं, त्वत्कन्या, निश्चयेंच मद्दासी ॥६॥

एवढ्यानेंच तुझी तृप्ती होत नसेल, तर आणखी ऐक तुझ्या कन्येचे संबंधानें—

तारुण्याचा भर हा जातां तिज निश्चयेंच योजीन ॥

गृहसंमार्जन कामीं, शेज कराया तिलाच लावीन ॥ ७ ॥
तदनंतरही तिजला तुज वृद्धातें, कधीं न भेटविन ॥
त्वद्देशापासूनही बहुतच देशांतरास धाडीन ॥ ८ ॥

( याप्रमाणें त्या राजाचें भाषण ऐकतांच, आधींच संतापानें ग्रस्त झालेला, तशांत मानहानि झाल्यामुळें, आगीवर तेल पडल्याप्रमाणें त्याचा पित्तक्षोभ त्याला अनावर होऊन तो बेफाम झाला, आणि त्या राजसभेंतून पडत झडत बाहेर पडूं लागला; पण राजाचे मर्मभेदक भाषण त्याचे मनास डंवचीतच होतें, त्या योगानें सभेंतून निघते वेळीं)

**वि॰ ब्रा॰**—रे मदांधा राजा, देवा ब्राह्मणांची अशी हेटाळणी करतोस हें तो सर्वसाक्षी जगदीश पहात आहे; तो, ह्या तुझ्या उन्मादाचा तुला लवकरच चमत्कार दाखवील. ( असें बोलून निघून जातो ) सर्व सभासद आपापल्या स्थळास जातात.

---

## प्रवेश २ रा.



**स्थळ—सुंदरवन, श्री गणेशपूर व हरीपूर क्षेत्र.**

(तदनंतर गंगातीरच्या दऱ्याखोऱ्यांतून चढतां उतरतां मेटीकुटीं येऊन कष्टत भागत आपल्या आराध्य देवाच्या मंदिरास पोंचल्यावर आपत्य मोहानें व्यग्र व मानखंडनेनें व्यथितांतःकरण होत्साता आराध्य देवाच्या आराधनेस यथाविधि आरंभ करून—)

वि० ब्रा० साक्या.

गणेशपुर हें नाम पडाया कारण तूंची असशी ॥
गाणपत्य हे तुज भजती त्या रक्षण तूंची करिशी ॥९॥
तुझा विभूती साक्षात्कारचि येथें विदित जनाला ॥
चिद्रुपतेंची हृदयीं वसतें विदिताचि सूज्ञ मनाला ॥१०॥
निष्ठेनें म्यां पूजन केलें नानाविध पुष्पांनीं ॥
सत्य असे जरि पाजळिले दिप गोघृत बहु कष्टांनीं॥११॥
पाशांकुशधर मूषक वहना गौरी तनया पावें ॥
अंध सुताचें विक्रम बलहीं बहुतच विलया न्यावें॥१२॥

(याप्रमाणें प्रार्थना करून, देव दृष्टांत देई पावेतों अन्नपानादि कांहींच सेवन करावयाचें नाहीं; असा निग्रह करून विश्वंभरभट्ट ध्यानस्थ बसतात. भक्ताची निष्ठा पाहून श्रीनें—

श्लोक.

ऐकून धांवा द्विज उत्तमाचा ॥
धावून आला गणराज साचा ॥
कोपून घेई जंव तो धनूला ॥
पाहून कांपे बहुकाळ ज्याला ॥ १३ ॥
भीमा रूपा घेऊनी देवराव ॥
झांकी सूर्या दाउनी स्वप्रभाव ॥
बोले क्रोधें पाश मी मोकली तों ॥
भूपाचें त्या सैन्य मी मारवीतों ॥ १४ ॥

असा विश्वंभरास दृष्टांत देऊन श्रीगजानन अंतरधान पावले.)

## प्रवेश ३ रा.



### कर्णाचा राजदरबार.

**सुशर्मा**—अंगराजा, वंदन करतों.

**कर्ण**—(सुशर्म्याकडे अवलोकन करून) कां आज लष्कर-चे बहुतेक अंमलदार बरोबर घेऊनसे आलां ?

**सुशर्मा**—महाराज काय चमत्कार असेल तो असो. ह्या आठवड्याचे आरंभापासून आमच्या प्रत्येकाचे गोठांत कोणास कांहीं, कोणास कांहीं, असा तुरळक, उपद्रव होऊं लागला होता, पण त्याची वर्दी आपल्या पावेतों आणण्यासारखें दुर्धरसें कांहीं वाटलें नाहीं पण कालचा प्रकार कांहींसा विलक्षण भासला. पहिल्यानें शिकारखान्याशीं आरंभ झाला. काल प्रातःकाळचा, सुमारें चार घटका दिवस चढला असेल, त्या वेळीं अंमळ मोठा वारा सुटून चोहोंकडून धूळ उडूं लागली. आकाश निरभ्र होतें. पण, शिकारखान्याभोंवतीं मात्र, त्या धुरळ्याचे गर्दींत, उल्कापात होऊं लागला. तो तेवढ्याच प्रदेशांत एक मुहूर्त पावेतों होत होता, म्हणून हें आहे तरी काय तें पहाण्याकरितां मनुष्य पाठविला, तो त्या धुरळ्याचे गर्दींत शिरतांना मात्र दृष्टीस पडला, त्याची कांहीं वेळ वाट पाहून दुसरा पाठविला, त्याची पहिल्याप्रमाणेंच गती, असे पांच प्यादे शोधाकरितां एकामागें एक गेले. हा सपाटा सुमारें दोन घटका उ-

डाल्यावर, वारा पडून शांतता झाल्यावर, तेथें स्वतां जाऊन पाहिलें, तों वणव्यांत होरपळल्याप्रमाणें श्वापदें जळून मेलीं, व तपासास गेलेल्या माणसांचीही तशीच वाट लागली. ह्याप्रमाणें शिकारखान्याची स्थिति झाली. इतकेंच नव्हे तर—

### आर्या.

नौका भग्न करूनचि श्वानाश्वादिक समस्त संहरुनी ॥
त्यानंतर फौजहि बहु देवाद्यें धाडिलीच यमसदनीं ॥ १० ॥
जिकडे पहावें तिकडे शव ढिग पर्वत समानकीं दिसती ॥
धुंद दिशा बहु झाल्या सरणाग्नी चहुकडेच झगझगती॥ ११॥

अंगराजा, हा असा कहर गुदरल्यामुळें सर्व सैन्यांत हाहाःकार होऊन गेला आहे; फार तर काय पण आमच्या तोंडचें पाणी पळालें आहे. तर जेणेंकरून सर्वत्रांची भीति दूर होईल, अशा उपायांची योजना करणार आपणाशिवाय कोणी समर्थ नाहीं. असलेली स्थिति आपल्या कानावर घातली आहे.

**कर्ण**—आपण सांगितलेली स्थिति ऐकून मलाही विस्मय वाटतो. अस्तु आतां आपण जावें, व सर्व कामगारांस आपआपले ठिकाणीं जाण्यास परवानगी द्यावी; आणि मला कळविण्याजोगी कांहीं गोष्ट घडूं लागल्याचें दृष्टोत्पत्तीस येतांच वर्दी देत जा, म्हणून ताकीद द्यावी. आतां आपण कळविलें त्या गोष्टीचा आह्मी लौकरच विचार करूं. (सुशर्मा, बरोबर आलेल्या सर्व कामगारांसह कर्णाची आज्ञा घेऊन निघून जातो.) कर्ण एकांतात ह्या गोष्टीचा विचार करीत असतां त्या कहराचें

बीज कांहींच लक्षांत येईना म्हणून सचिंत बसला, इतक्या अवसरांत रात्र फार होऊन गेल्यामुळें बसल्या जागींच कर्णाचा डोळा लागला आणि त्या झोंपेच्या गुंगींत तो असतां श्रीचामुंडा देवी त्याचे स्वप्नांत येऊन.

श्लोक.

मेले वीर बहूत तो कहर हा झाला तरीं कां नहा ॥
होशी सावध तूं वृषा न अझुनी शंका मला ही महा ॥
क्षोभोनी गणनायकें सकल हीं विघ्नें पहा निर्मिलीं ॥
शोधातें करिशी न तूं तरि गती वाटे न मातें भली ॥ १२ ॥

इतकें सुचवून चामुंडा अंतर्धान पावली. कर्ण जागा झाला; आणि आपण ज्या कूटांत मतिमंद झालों होतों त्याचा सुगावा श्रीभगवतीनें दाखविला हा तिचा आपणांवर अनुग्रह आहेसें मानून, दुसरे दिवशीं गर्गमुनी, अश्वत्थामा, प्रभृतीस पाचारण करून सभा भरवून मुख्यस्थानीं राजास बसवून—)

**कर्ण**—हे श्रेष्ठ जनहो; वीरहो; बांधवहो; प्रस्तुत आपण मणिपुरावर शिस्त धरून ह्याठिकाणीं तळ देऊन राहिलों आहों पण किती दुःखाची गोष्ट सांगावी ! इंद्रप्रस्ताची लढाई सर करून जे वीर वांचून यश घेऊन आले, त्यांपैकीं कित्येकांस येथून एकाएकीं काळानें नेलें; हें पाहून फार वाईट वाटतें. या गहजबाचे तडाख्यांतून जे वांचले आहेत ते तरी सुखी रहावे म्हणून तूर्त मोर्चा फिरविण्यासही कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. पण सांप्रत युद्धप्रसंग नसतां एकाएकीं हा सैन्याचा सं-

व्हार झाला, हा श्रीगणपतीच्या क्षोभानें झाला आहे, असा गेले रात्रीस मला दृष्टांत झाला. तर विघ्ननाशकाचा असा क्षोभ होण्यास कारण काय झालें असावें, हे कोण्यातरी आर्यमुखानें श्रवण करून घेणें विहित दिसतें. कारण गणपतीसारखें सौम्य दैवत्य दुसरें नसतां, त्या देवाचा एवढा क्षोभ झाला. तेव्हां त्याचे अर्चनविधींत, किंवा व्रतांत किंवा हवनविधींत वैपरित्य झाल्याशिवाय क्षोभ झाला नाहीं हें उघडच आहे. म्हणून होम हवनादिकांनीं त्या गजाननाचें सांत्वन केलें पाहिजे, इतकेंच नाहीं, तर जेणेंकरून तो एकदंत, संतुष्ट होऊन आपणांवर त्याचा पुन्हा क्षोभ न होई असा कांहीं उपाय करणें अवश्य आहे. म्हणून हा येवढा त्या देवाचा क्षोभ होण्यास कारण काय झालें असावें. त्याचें बीज कोण्या तरी सुजाणाचे मुखानें सर्वांस कळावें, अशी इच्छा आहे. ( असें कर्णाचें भाषण ऐकल्यावर—)

**गर्गमुनी—** **आर्या.**

भूत भविष्यज्ञ चतुर, वयवृद्ध ज्ञानवृद्धहि तसाच ॥
गर्ग पुरोहित, कथि, जो कुरुतें, जनि, नित्य, जेंकिं हित, साचा ॥
रे अंगपते, गणपति कोप कळाया, नकोत श्रम फार ॥
परि, सत्यचि तें, बा, बहुकटु थोरां, वक्ताजयीं, निराधार॥ १३॥

आणखी पहा—

रयतेनें राजाचें दाखविणें दोष, फार दुर्घट तें ॥
तत्क्रोधहो क्षणिकपरि, परिणामी थोर होति घातक ते ॥ १४॥

म्हणून–

कर्णा, जरि तूं सत्यचि वृत्ता वांछिशि, तरी स्वयें सिद्ध ॥
वक्त्यातें रक्षाया, असि घेउनि होई, बा, वचनबद्ध ॥ १९ ॥

**कर्ण**—हे आचार्य, आपलें भाषण ऐकून फार संतोष वाटतो. अहो हें कृत्य कोणा एकाच व्यक्तीचे कल्याणानिमित्त करण्याचें आहे असें नाहीं. कौरवेश्वराच्या, व त्याच्या संग्रहीं जे हे कामगार, त्यांच्या व त्यांच्या सैन्याच्या आणि तदंगभूत सर्व राष्ट्राच्या कल्याणाकरितां करावयाचें आहे, हें स्पष्टपणें सर्वांस कळतच आहे. तेव्हां हें करण्यास कोणाचें मत प्रतिकूळ असेलसें दिसत नाहीं; म्हणून आपण कोणती जी आज्ञा कराल तें करण्यास कोणी अमान्य करीलसें वाटत नाहीं. म्हणून ह्या सार्वभौमप्रतापी नृपतीच्या व ह्या सर्व युद्धदक्ष बांधवांच्या, समक्ष आपणास सांगतों, कीं ज्या जगनियंत्याच्या इच्छेनुरूप हें जग चालत आहे, व ह्या कुरुपतीच्या कल्याणार्थ आपण ऋत्वीज होऊन हवनद्वारें ज्यास हविर्भाग अर्पण करतां, ज्याचे कल्याणकारक साक्षात्कार कुरुपतीस व आम्हा सर्वांस आपणांकडून कळतात त्या देवाची शपथ वाहून सांगतों, कीं आपणास जें काय कळलें असेल तें आपण निर्भयपणें बोलों. जावत्काल ह्या कर्णाच्या देहांत जीव आहे तावत्काल ह्या कुरुमंडळापैकीं अथवा, हा योधसमुह मिळाला आहे ह्यापैकीं आपणाकडे वर डोकें करून पहाण्याची कोणाची शक्ती आहे असें भासत नाहीं. फार तर काय सांगूं, पण हा राजाधिराज

सुयोधन जो हा ह्या स्थळीं आह्मा सर्वांवर मुख्य आहे, तो दे-खील आपल्या देहास तर लांबचीच गोष्ट, पण आपल्या छा-येस देखील स्पर्श करण्यास समर्थ नाहीं असें समजा, आणि बोला आपणास काय कळलें असेल तें. कोणतेही प्रकारची शंका धरूं नका. याप्रमाणें कर्णाचें अभय मिळतांच—

**गर्गमुनी**— **श्लोक.**

विप्राची मानहानी कटुवच मथनें केलि जी ती नृपानें ॥
त्याच्या प्रत्यूपकारा प्रखर तर व्रतें प्रार्थिला देव त्यानें ॥
कांहीं नाहीं, दुजी, हो, नवस हवनींही, चूक, भ्रांती कशाला॥
भक्तत्राणींच आहे सदय बहु सदां सोडि, तो, बाण ज्याला १६

या गोष्टीचा प्रतिकार मला जो वाटतो तो—

**श्लोक.**

धन लवहि न घेतां भूप मीनाक्षिबाई ॥
धन जनसह धाडी तत्पित्याच्या न गेहीं ॥
तवरि गणपतीचा क्षोभ शान्ती न पावे ॥
नृपकृत *गुरुदोषें लोकहानी नटावें ॥ १७ ॥

**ओंवी.**

शरण रिघोनी निश्चयेशीं ॥ विश्वंभर कृपेशी ॥
जरी राया पात्र होशी ॥ तरीच देव रक्षिल ॥ १८ ॥

(याप्रमाणें गर्गपुरोहिताचें भाषण ऐकतांच राजाचे अंगीं सं-ताप संचरून, तो क्रोधावश होऊन, सर्पासारखा फोंफाऊं ला-

---

* मोठ्या.

गला. त्याचें हृदय त्वेषवश होऊन खवळून गेलें. नेत्र लाल होऊन चढून गेले, आणि आपल्या दैदीप्यमान सिंहासनावर मोठ्या ऐटीनें उपाई येऊन मोठ्यानें गर्जना करून—)

**दुर्योधन**—हा दुष्टभविष्यवादिन! हा चिरकाल दुष्ट शकुन कथन करणाऱ्या! यापेक्षांही माझा हृदयस्फोट करणारी व आत्मश्लाघेनें मला क्षोभविणारी अशी कांहीं वार्ता सांगण्याची तुझ्या मनांत खुमखुमी आहे वाटतें. अरे! माझ्या प्रजेनें मजविषयीं सदा कुरमुरावें, त्यांच्या दुर्दैवानें जे त्यांजवर घाले पडतात ते माझ्या दुराचरणाचे योगानें ईश्वर क्षोभून पडतात, असें प्रजेचें मनांत बिंबवूं पहातां काय? माझी मानहानी करण्या प्रीत्यर्थ हा तुम्हीं सारा विभू रचला आहे, हें मी जाणून आहें. अरे मीनाक्षीला आह्मी आपल्या पराक्रमानें संपादन करून आणिलें. या आचरणानें ब्राह्मणाचें कूळ भ्रष्ट होतें काय? वाः काय तुमचें शहाणपण! अरे मीनाक्षी तर माझ्या पौरुषाप्रमाणें देवानें मला बक्षीस दिली असें समजून मी तिचा अंगिकार केला आहे. अहा हा!!! काय योग्य बक्षीस!

श्लोक.

जीच्या रूपा न लागे युवतिमद बहू वाहते जी रुपाचा ॥
*नाकीं मान्याच ती हो बहुत हळहळे पाहतां वर्ण जीचा ॥
लोकीं मान्या गुणे जी सुगर निपुण जी रंजयंती तशीच ॥
वाटे सौंदर्यखाणी मदन रतिच कीं दूसरी भीमकीच ॥ १९ ॥

* स्वर्गीं.

### आर्या.

हीच्या अंगस्पर्शें वाटे सुख तें नसें दुजा ठाया ॥
भानुमतीच्या वाटें, सुख बहु, परि, तें, हिच्यापुढें, वांया॥२०॥

पण प्रजेस जेणेंकरून दुःख तें मला दुःख; आणि, प्रजेस जेणेंकरून सुख तें माझें कर्तव्यकर्म होय. तस्मात् ही मीनाक्षी मला इतकी प्रिय आहे तरी तिला मी पाठवावी हें योग्य. पण तिचे गुण, तिचें रूप व तिचें चातुर्य, इतक्या गोष्टी मनांत घोळत आहेत; त्यामुळें असें वाटतें कीं, जसा नेमानेम असेल तसें घडेल. मीनाक्षीस पाठविण्यास माझ्यानें रुकार देववत नाहीं.

**गर्ग०**—राजा तुला माझ्या बोलण्यानें राग आला. पण जें वास्तविक माझ्या होण्यांत येईल तें तुला कळवावें हें माझें कर्तव्यकर्म होय. तूं क्षोभलास तसें मला रागावतां कामा नये. माझे वयानुरूप माझें वर्तन नसलें तर मात्र मला लांछन. अस्तु. आतांच तूं बोललास तसें करूं नको. एकवार त्या तपोधनाची मानखंडना केल्यामुळें हा प्रलय झाला, हें प्रत्यक्ष तूं पहातोसच आहेस. आतां तरी भलतीच अविचाराची गोष्ट मनांत आणूं नको. माझ्या सांगण्याप्रमाणें न करशील तर काय होईल तें माझ्यानें स्पष्ट सांगवत नाहीं. आणखी पुन्हां सांगतों.

### श्लोक.

आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि ॥
पुनर्दारा पुनर्वित्तं न शरीरं पुनःपुनः ॥ २१ ॥

**सभासद**—आचार्यांचें म्हणणें रास्त आहे व तसें करण्यांतच आपलें कल्याण आहे.

**राजा**—बरें, तुह्मी म्हणतां त्याप्रमाणें मीनाक्षीस मी पाठवीन, पण सर्वांचें कल्याणाप्रीत्यर्थ मी आपली प्रिया पाठविण्यास सिद्ध आहें तसें तुह्मी सर्वांनीं मिळोन माझ्या प्रियेचें विरहजन्य दुःख मला न बाधेल, व मी केलेले परिश्रम व्यर्थ गेले, असें मला न वाटूं देण्याची तजवीज तुह्मी केली पाहिजे. आणि असें कराल तरच मीनाक्षीस मी पाठवीन. नाहीं तर मीनाक्षीस पाठवून मी दुःख करीत कालक्रमण करावें आणि ( कर्णास लक्षून ) तुह्मी मौजा मारीत बसावें, मग मी तुमच्या तोंडाकडे पहात बसूं काय! असें ऐकतांच सर्व सभासद कर्णाचे तोंडाकडे टकमक पाहूं लागले.

**कर्ण**—हर हर !!!

## आर्या.

जगतीं भूप श्रेष्ठचि असतांही बहु प्रभाव हव्यास ॥
त्याहुनही धनलोभीं त्रिजगीं तुळण्या दुजा नसे ह्यास ॥ २२ ॥

हे राजा ! रणामध्यें झुंजून आमचे पराक्रमानुरूप जें कांहीं आह्मास प्राप्त झालें त्याजवर तुझा डोळा आहे, असा तुझ्या बोलण्याचा आशय असावा असें वाटतें. पण आह्मास जें प्राप्त झालें आहे तें आह्मी स्वपराक्रमानें शहराचीं शहरें जमीनदोस्त करून, व रणामध्यें रणनवरे म्हणविणारे अशा वीरांस हतवीर्य करून संपादिलेलें आहे. ज्याचें अर्जन करतांना आमच्या हा-

डांचीं काडें होऊन गेलीं आहते. न्यायदृष्टीनें पाहिलें असतां-ही रास्त; असें द्रव्य आपल्या व इतर सभासदांच्या संमतीनें आह्मास प्राप्त झालें आहे. तें आह्मीं आपणास द्यावें असें आपण इच्छितां हें आपणास योग्य काय! अहो द्रव्यास लोभाविष्ट होऊन आपण लढत होतां तर वारुणावतीहून जी दौलत लुटून आणिली आहे ती, या स्वारीस आपणास जो खर्च पडेल तो भागून, बाकीची आपण पाण्याप्रमाणें उमाप उधळली तरी कित्येक पिढ्यांपावेतों पुरण्याजोगी आहे. असें असतांही आह्मास मिळालेले बक्षिसावर आपण नजर ठेवाल तर हा मोठा जुलूम आहे. आतां आपणास कळवितों कीं, ईश्वर पाठमोरा होऊन आमचीं राज्यें लयास जातील, आणि आह्मी अगदीं हीनबल होऊन दांतीं तृण धरून दीन होऊन बसूं, तेव्हां काय घडेल तें घडो. प्रस्तुत म्हणाल तर, ज्याचे मणगटास केंस आले असतील तो आपलें म्हणणें मान्य करील. आपल्या कडून तर नाहीं तशी गोष्ट घडायची.

**राजा**—नाहीं नाहीं मीं आपली प्रिया तुमचे सर्वांचे मर्जीखातर व कल्याणार्थ सोडून चुरमुरत कुशी खाजवीत पडावें, आणि तुम्हीं ख्यालीखुशाली करीत बसावें, म्हणजे मात्रच चांगलें. नाहीं बरें! हा मूर्खांहो, इतकी प्रौढी कशाला दाखवितां, आपण मोठे योद्धे आहां म्हणून आपणास मोठा अभिमान आहे, पण त्याची शेखी आपण मला दाखवितां काय?

आर्या.

योद्धा असशील तरी अस तूं, हो, जा रणांत भार्गवसा ॥
परि मद्वीरपरिग्रह वांछिशि कैसा अनाथ पाडससा ॥ २३ ॥

तर पुन्हां सांगतों, कीं मीनाक्षीच्या तोलाचें, व मी मागेन तें माझ्या मनाजोगें असें जें असेल तें ठेव अगोदर येथें, मग बोल काय बोलायचें तें. ह्याशिवाय आणखी सांगतों ऐक.

आर्या.

मेळविलें धन लुटिनें त्यावरचा सर्व हक्क सोडावा ॥
समसप्तकें, सुशर्मे, त्यांपरि तूं सत्य भूप जोडावा ॥ २४ ॥
अथवा सत्तेनें मी, माझ्या आणिन धरून ती दासी ॥
राजपरिग्रह समजुनि, जरि तूं बहु दाविशील खेदासी ॥२५॥
ज्यापासुनि होतें जें नष्टचि त्यासाठिं मारि, तो, हांका ॥
लोभें क्रोधें बहुपरि संतापुन व्यर्थ दावितो शोका ॥ २६ ॥

अस्तु. असा प्रसंग आणूं नकोस. आणि आलाच तर— 'आलें अंगावर कीं घेतलेंच शिंगावर' ह्या न्यायानें वागावें लागेल. ह्याचा विचार कर. ( सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ४ था.

राजदरबार.

( कंचुकी दरबारांत प्रवेश करून, आपल्याशींच ) या स-

मयीं महाराजांची वृत्ति रोजच्याप्रमाणें दिसत नाहीं. अशा समयास निरोप कळविला तर कसें होईल बरें ! ( थोडा विचार करून ) उंः होवो काय नशीबीं लिहिलें असेल तसें. आपण आपलें काम जेव्हांचें तेव्हांच बजाविणें हें रास्त, ( असा मनाचा धडा करून )

**कंचुकी**—सरकारचा विजय असो. गणेशपुरास पाठविण्यासाठीं उत्तम प्रकारच्या हवनद्रव्यांनीं नौका भरून तयार करविली आहे. नाविक धंद्यांत निष्णात, शरिरानें धट्टेकट्टे. व शेंकडों वेळां तुफानांतून मोठ्या शिताफीनें जहाज हांकारून निभावून आलेलें नावाड्यांचीही योजना करविली आहे. अशा तयारीनिशीं सिद्ध करविलेल्या उत्तम कृष्णवर्ण नौकेवर बसून गणेशपुरास जाण्याची मीनाक्षीबाईकडूनही तयारी करविली आहे. आतां बाईसाहेबांस पोंचविण्यास बरोबर कोण पाठवावयाचें ती तजवीज मर्जीनुरूप व्हावी, म्हणोन कळविण्यासाठीं, मामासाहेबांनीं सरकारचे चरणाजवळ हजर होण्यास सांगितल्याप्रमाणें, हा सेवक हजर झाला आहे.

**राजा**—हें काम निर्विघ्न, व सुरक्षितपणें तडीस गेलें पाहिजे म्हणून समसप्तकानें, सुशर्म्यानें, किंवा सैंधवानें जावें, म्हणजे फारशी काळजी नाहीं. अगर ह्यांपैकीं कोणीच नको. अंगराजानेंच जावें. कारण प्रस्तूत उद्भवलेल्या उपाधीचा उपशम करण्याचे प्रकारांची योजना करण्याचें काम मोठें नाजूक तसेंच बिकट आहे, म्हणून अंगराजा बरोबर असला म्हणजे को-

णत्याही वेळेस, कोणत्याही ठिकाणीं व कसाही प्रसंग आला तरी तो निवारण करण्याजोगा सामर्थ्यवान् अंगराजासारखा प्रतापी कोणीच नाहीं. ह्या कारणामुळें ह्या कामास अंगराजानेंच जावें, अशी माझी आज्ञा आहे. आतां ह्या कामाचा नाजुकपणा, अंगराजा प्रस्तुत क्रोधवश झालेला असल्यामुळें त्याचे ध्यानांत येणार नाहीं. पण ह्या प्रसंगीं त्याचे क्रोधाची मातबरी उद्भवलेल्या अरिष्ठापुढें मी कांहींच समजत नाहीं. अंगराजानेंच ह्या कामास जावें अशी माझी आज्ञा आहे.

**कर्ण**—( रागानें लाल झाला, आणि भ्रुकुटी चढवून राजाकडे नजर फिरवून आवेशानें ) रे नराधमा, मदांधा, वृथा शस्त्रभारवाहका, कापट्यनिपुणा, धनदासा, भूपाधमा ! मजसारख्याची अशा क्षुद्रकामीं योजना करण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं ! रे हा एवढा नृपसमूह मिळाला आहे. ह्यांतील प्रत्येक राजास तुझ्यांत कितपत पाणी आहे हें कधींच कळून आलेलें असतां, तुजसारख्याचे आज्ञेनें ह्या इंद्रप्रस्थावर स्वारी करण्यास एकानें तरी पाऊल उचललें असतें कायरे ! मला तरी ह्यास बरोबर घेऊन त्यांवर* शस्त्र उचलावयाची काय गरज पडली होती ! तुझ्याचनारे निमित्तानें ! त्यांनीं माझ्याशीं कधीं खाजवाखाजवी केली नाहीं. त्यांनीं माझे राज्यांतील कोण्या एखाद्या मांडलिकाशीं देखील वैरभाव दाखविला नाहीं. त्यांच्या शेजारीं माझें राज्य—

* पांडवांचे हित चिंतणारांवर.

श्लोक.

सागर-ध्वनि नये कधिं कानीं ॥
फीरती हय सुखें जायि रानीं ॥
रक्षिती सुचिर पर्वत भिंती ॥
भूमि ते मज नदे कधिं खंती ॥ २७ ॥
समृद्धी असे तैं सदां ते पिकाची ॥
कणाची जशीरे तशी ती फळांची ॥
बहू जन्मले ख्यात ते बूध जेथें ॥
लढाऊ जनांला नसे वाण तेथें ॥ २८ ॥

असें सुखदायक व निष्कंटक माझें राज्य असतां, केवळ तुझ्याशीं मैत्री जडली. त्या मित्रत्वास लक्षून तुला सहाय करण्यासाठीं आलों, त्याचा कायरे हा उपकार! अरे तुझा पक्ष धरून लढलों आणि हे घाय सोसले त्यांचा मोबदला कारे हा! तुझ्याकरतां वार खाऊन रक्तस्त्रावही सहन केले, अशा मजसारख्याची मानहानी करून व माझ्या पौरुषानुरूप तर नाहींच, पण तुझ्या मनास आलेलें मला बक्षिसाखातर सर्वानुमतें दिलेलें तूं बुचाडून घेऊं पहातोस काय! अरे कृतघ्ना! बरें बक्षिसादाखल जें मला मिळालें आहे तें तरी—

श्लोक.

माझें बक्षीसरे दुष्टा, पहातां बहु क्षुल्लक ॥
रणीं त्वत्पराक्रम तो, तुळितां मम पौरुषा ॥२९॥

अरे जें मला मिळालें आहे तें माझ्या निढळच्या घामाचें आहे.

आणि तुला ( जेथें जेथें यश आलें तेथें तेथें ) आयते गोळे गट्ट केलेलें आहे. आणि ज्या ज्या वेळीं निकराचे प्रसंग आले त्या त्या वेळीं भुजा ठोकून मी पुढें झालों, आणि यश घेतलेंसें दिसलें म्हणजे ( तोबऱ्याला पुढें ) ह्या न्यायानें लुटींतला जो उत्तम अंश तो तूं उपटावास आणि यःकश्चित् कांहीं तरी मला द्यावें, असें करणारा तो तूंच नारे ( कपटी ) मीं रणांत लढून वार खावे आणि यश मिळविलें कीं, तूं त्या वेळीं थोडीशी पोकळ पंडिताप्रमाणें तारीफ करावीस तो तूंचना ? ऐक आतां.

आर्या.

रे गर्वराशि राजा समज आतां कर्ण हा नव्हे दास ॥
मणिपुर सिमेवरी तुज सोडुनि हा चाललों स्वदेशास ॥३०॥

**राजा**—(कुचेष्टेनें हं हं हं) जातोस का? जा जा. (रागावून)

श्लोक.

वांछा नाहिं अह्मा तुझ्या मदतिची जा येथुनी सत्वर ॥
शेखी दाविशि ती तुझी उतरण्या घेती न *हेती कर ॥
नाहीं वाण, तुझ्या समान नृप, ते, येथें बहू दीसती ॥
आहे रक्षण तो परेश मजला त्यालाच माझी क्षिती ॥३१॥

सर्वा नृपांमाजि तुझ्यासमान ॥
भांडाळ दंडेल नसेचि अन्य ॥
स्पर्धा वरिष्ठाशिंच तूं करिशी ॥
दुजा असा कोणि न पापराशी ॥ ३२ ॥

* तरवार.

जेव्हां पहावें तेव्हां तुझी धुसफूस चाललीच असते. लढाईची अगर त्याहूनही एकाद्या घोर कृत्याची गोष्ट निघाली कीं तुझ्या फुरफुरल्याच बाह्या ! पावलोपावलीं क्षणोक्षणीं तूं आपल्या बळाची फुशारकी मिरवीत असतोस, पण हा तुला वृथा अभिमान आहे. तें एक तुला ईश्वराचें देणें आहे. बरें तूं जातोसना ? जा तर लौकर. निघ येथून कसा. काय तुला नारे नाचविण्याचे असतील ते नाचव आपले राज्यांत, जा. मी तिकडे ढुंकून देखील पहाणार नाहीं. पण लुटींतला बरोबरीचा भाग कुठे आहे तो ठेव येथें अगोदर. हा शाकुसोबत्या वृथा द्वेष करणाऱ्या ! तुझीं धमकीचीं बोलणीं आणि गुरगुरावणीं काय दाखविणें तीं तूं आपल्या राज्यांतल्या बायाबापड्यांना दाखीव पाहिजे तितकीं. माझ्यापुढें असे छक्केपंजे चालावयाचे नाहींत समजलां राजाजी. येथें काय भिणें संवरणें तें मला. रहाणें असेल तर मी म्हणेन तसें तुला वागलें पाहिजे. समजलास ! दुसरें आणखी सांगतों ऐक.

श्लोक.

मीनाक्षीला येथुनी धाडण्याची ॥
आज्ञा झाली सत्यसे देव याची ॥
नौका सैन्या देउनी साथ तीच्या ॥
देशा तीतें धाडितो मी पित्याच्या ॥ ३३ ॥

पण तुला आणखी जतावून सांगतों. हें नीट लक्ष देऊन ऐक—

श्लोक.

मिळाली तुला जी लुटीमाजि दाशी ॥
जिला मानिशी तूं प्रिया रूपराशी ॥
परी जाणती सत्य तुला न जीरे ॥
किती शूर तूं उग्र तूं आस कीरे ॥ ३४ ॥

आणखी सांगतों कीं माझ्या आज्ञेप्रमाणें न वागशील तर— मृगनयना, चंद्रवदना, शुकनासा, सिंहकटी, गजगामिनी, कुंभस्तनी, पीकलापा, तन्वंगी अशी जी तुझी चंद्रप्रभा, तिला तुझ्या शिबिरांतून, तुझे कवेंतून ओढून आणीन. तेंव्हां तुला व ह्या सर्व नृपसमूहाला माझें सामर्थ्य काय आहे हें येईल कळून, आणि मग बसशील आंसवें गाळीत. अरे हा चक्रवर्ती जगदीशा व्यतरिक्त कोणाची पर्वा बाळगीत नाहीं कळलें!

(याप्रमाणें राजाचें भाषण ऐकतांच कर्णास अनावर त्वेष चढला. त्याचें अंतःकरण अगदीं खवळून गेलें. चित्तवृत्ति स्थितीवर नाहींशी झाली, विंगळाप्रमाणें लाल झाला. आणि कोशांतून खड्ग उसपण्यास त्यानें हात सरसावला. आणि सभासदांचे दाटींतून मुसंडी मारून जाऊन राजास प्रहार करण्याच्या ऐटीनें उठला, इतक्या अवसरांत वारें भयाण सुटलें, धुळीनें आकाश व्याप्त होऊन दिशा धुंद झाल्या, विजा लवूं लागल्या, मेघगर्जनेचे गडगडाटानें दिशा कोंदून गेल्या, अगदीं प्रलयकाळचा समय प्राप्त झालासें प्रेक्षकजनास भासूं लागलें, त्यामुळें ते अगदीं भांबावून गेले, जिकडे तिकडे हाहाःकार हो-

ऊं लागला ) इतक्यांत " भो अंगराज इदानींत्वं कोपाविष्टमा-भूः उतच त्वत्कोपशमनार्थमियंभगवती प्रेषिताएतदाज्ञा त्वया-नोल्लंघनीया " याप्रमाणें ऐकतांच—

**कर्ण**—काय! ही अशरीरवाणी मला प्रतिबंध करत्ये का-य! ऊंः यांत काय आहे. ( असें बोलून मोठ्या आवेशानें निघाला पण मागचे अंगानें श्रीभगवती गुप्त रूपानें प्राप्त होऊन कर्णाच्या उपवस्त्रांचलीचें आकर्षण करून त्याच्या गतीच्या वे-गाचें तिनें आकलन केल्यामुळें त्यास पुढें जातां येईना. म्हणून सिंहावलोकन करून पाहतो तों श्रीभगवती त्यास गोचर होतांच)

**कर्ण**—हे भगवती! चरणाप्रत वंदन करतों. हे अंब! हे नाकवासिनी! हा अंधसुत माझी कशी मानहानी करित आहे हें तूं पहातेसच आहेस, व मी त्याचा प्रतिकार कसा क-रतों हेंही अवलोकन कर. मला त्या दुष्टाचा सूड उगविण्यास प्रतिबंध करूं नको अशी माझी तुला प्रार्थना आहे.

**भगवती**—अंगराजा! श्रीईशमायेला राजा प्रिय आहे त-साच तूंही प्रिय आहेस. प्रस्तुत राजानें कटुवचनांनीं तुझी नि-र्भर्त्सना केली ह्याचा ह्या समयीं तूं विषाद मानून त्याचें उसनें घेण्याचें मनांत आणूं नको. ह्या गोष्टीचा राजास पश्चात्ताप होऊन त्यानें तुला विपुल द्रव्य देऊन तुझी मनधरणी करूं ला-गण्याचा प्रसंग कालवशेंकरून, लौकरच प्राप्त होणार आहे. तूं उताविळ होऊं नकोस. ह्या समयीं तूं क्रोधाचें आकलन कर आणि खड्ग कोशांत घाल. उसनें घेण्याची गोष्ट मनांत

ठेवूं नको. अशी माझी तुला आज्ञा आहे. ( याप्रमाणें श्रीभगवतीचें भाषण ऐकून कांहीं वेळ विचार करून )

**कर्ण—** **ओंव्या.**

सर्व ऐकिलें सादर चित्तीं ॥ हे माते भगवती ॥
ह्या तुझ्या आज्ञेप्रती ॥ दास सादर असे हा ॥ ३५ ॥
जरी आहे बहु कठीण ॥ तरी क्रोधातें आवरून ॥
तुझीच आज्ञा म्हणून ॥ खड्ग कोशीं घालतों ॥ ३६ ॥

याप्रमाणें कर्णाचें भाषण ऐकतांच भगवती अंतरधान पावली. पण राजाचें भाषण कर्णाचे मनास डंवचीतच होतें. त्याची खुमखुमी गेली नव्हती त्यामुळें पुन्हां राजास लक्षून.

रे नराधमा, जगङ्व्याळा भ्याडा, सांगरे तूं कोठें कधीं दिग्विजय केलास तो ! कोणत्यारे स्थळी तूं शत्रूंवर छापा घातलास, कोठेंरे शत्रूशीं भिडलास, अरे तीं कर्मे आह्मींच करूं जाणे! तुला शंढाला त्यांतलें गम्य काय ? हातावर शिर घेऊन आह्मीं लढावें, दुसमानाचे पायावर पाय देऊन आह्मीं रण खेटावें. आणि तूं तें लांब बसून तेथून पहावेंस, आणि मारा, मारा, मारा, पण पाय मार्गे घेऊं नका असें ओरडावेंस. अगर जेथें कांहीं भय नाहीं तेथें शिबंदीचे टोळ्यांमधून मोठ्या दिमाखानें फिरावेंस, ह्यापेक्षां अधिक तें काय होणार तुझ्या हातून. तूं गरीबांचा मात्र बागुलबोवा. हा नराधमा ऐक माझी प्रतिज्ञा—

**श्लोक.**

जो दंड हा मम करांत सदैव नाचे ॥

जो योग्य भूषणचि दंडधरा नृपाचें ॥
जो होय वेत्रचि सख्या जगदीश्वराचा ॥
ज्या पासुनीच चिरउद्भवनीतिसाचा ॥ ३७ ॥

आर्या.

मूला वृक्षापासुनि आहे हा नित्य छिन्न झालेला ॥
तैसा तूं समज मला तुजपासुनि नित्य भिन्न झालेला ॥३८॥
या दंडा पत्र किं फल पुष्प, कधीं घालितां नये पाणी ॥
तुजला सहाय द्याया किमपि न घेतील हेति, मत्पाणी ३९

आणखी तुला ह्या राजदंडाची शपथ वाहून सांगतों कीं शत्रू तुझ्या फौजेंत शिरतील, आणि रण माजवून रक्ताचे पूर वाहवितील. तेव्हां तूं माझें साहाय्य मागूं लागशील, पण मग तें तुझें मागणें निरर्थक होईल. समजलास, या गोष्टीचा प्रत्यय येण्यास फार अवकाश नको. हा मणिपूरचाच राजा तुझ्या सैन्याची कत्तल उडवून पर्वतप्राय कबंधांच्या राशी रानोमाळ तुझ्या डोळ्यांदेखत पाडील, तेव्हां तुझ्या डोळ्यांवरचा धूर जाईल, आणि त्या राजास पाहून तूं भेदरून जाशील; तुझ्यानें त्याचें निवारण होणें तर दुरापस्तच. पण त्याच्या आवेशानेंच तुझ्या तोंडचें पाणी पळून जाईल. आणि मग ह्या आतांच्या अविचाराचा तुला पश्चात्ताप होईल. इतकें बोलून हातांतील रत्नखचित परजाचा दंड रागानें जमिनीवर आदळून स्तब्ध बसला.

राजा—अरे वाचाळा! पुनः पुनः आत्मश्लाघा कशाला करतोस! या तुझ्या वाचाळपणाकडे लक्ष्य देऊन मीं आपला

हेतु सिद्धीस नेण्याचें विसरेनसें समजतोस काय ! बस कर ही तुझी बडबड. माझ्याबरोबरीचें मीं तुला दिलेलें बक्षीस आण कुठें आहे तें लौकर. अशा प्रकारें दोघेही वादास पेटले. ही वार्ता हेरांनीं हस्तनापुरास कळवितांच (होत असलेला प्रकार बरा नाहीं, होऊं सकल्यास आपण हें भांडण मिटविण्याचाच यत्न करावा असें मनांत आणून द्रोणाचार्यांचा विचार घेऊन वरुणावतीस येऊन)

श्लोक.

वयें थोर जो ज्ञानसिंधू तसाच ॥
वचें पीयुषाचा गमे ओघसाच ॥
असे प्रीय शिष्य प्रभू भार्गवाचा ॥
करूं संधि पाहे वृषाचा नृपाचा ॥ ४० ॥
बहू अब्दतो जैं वसुधेस पाळी ॥
प्रजा नित्य ज्याची सुखाच्या सुकाळीं ॥
असा पुत्र जो तो नृपा शंतनूचा ॥
करूं संधि पाहे वृषाचा नृपाचा ॥ ४१ ॥

आतां भीष्म भाषण करणार असें पाहतांच सर्व सभा साल्हादाश्चर्यानें गजबजून गेली. पण थोडक्याच वेळांत जिकडे तिकडे सामसूम होऊन भीष्माच्या भाषणाकडे अवधान देण्यासाठीं सर्व सभासद तटस्थ झाले.

**भीष्म**—ईश्वरी मायेचा चमत्कार किती अतर्क्य म्हणून म्हणावा ! पहा. ह्या भूमंडळावर महान् महान् पराक्रमी आहेत

त्यांमध्यें ज्यांची गणना ! जे एकमेकांचे जिवलग मित्र. अशा वीर पुरुषांचे संवाद परपाक्षिकांनीं श्रवण करून गर्भगलित होऊन जावें, तें एकीकडे राहून ज्यांचा प्रकृत चाललेला वाद ऐकून त्या वृथा गर्व व शस्त्रभारवाहकांनीं व त्यांच्या सहाकाऱ्यांनीं आनंद मानावा काय ? हर हर ! तुमचा या क्षुद्रविषयक विनोदाचा असा अनिष्ट परिणाम होण्याचीं चिन्हें (परांनीं सहज ताडण्यासारख्या) विकोपास पोंचून असा परिणाम व्हावा हें ह्या कुरुक्षेत्रवासी वीरजनास तरी किती दुःखकारक लांछन हें ! या तुमच्या यौवनानुरूप ज्या ईर्षेस तुह्मी पडलां आहां अशा गौणपक्षाचा अंगीकार करण्यास तुह्मी पात्र नाहीं. या क्षुद्र वीरश्रीचें आकलन करा. आतां जें मी बोललों ही ह्या म्हाताऱ्याची उगीच बडबड आहे असें समजूं नका. तुमचे पूर्वज कसकसे पण पराक्रमी होऊन गेले !!! जो सिंहासनारूढ होई त्यास वडिलांनीं पौरुषानें जी भूमंडलावर कीर्ति केली त्याहून मोठमोठे साहसाचे संग्राम करून यश मिळवून पूर्वजांचे कीर्तीहून विशेष लौकिकास चढण्याचा हव्यास ! अहाहा.

### आर्या.

नहुषा विचित्र वीर्या दुष्यंता त्या तसेंच भरतास ॥
वर्णिति कविवर ज्यांना निशिदिनिं सत्कीर्तिचाच कीं ध्यास ॥४२॥

### श्लोक.

पृथुसम जगिं कीर्ती होय ऐशींच कर्मे ॥
करुनि अवनि टेपी पाळुनी धर्मवर्मे ॥

चिर जिव क्षिति नामा चंद्रवंशैकशाली ॥
नहुषवर नृपे त्या भोगितां भूमि घाली ॥ ४३ ॥

ज्याचें नांव घ्यावें त्याचे पराक्रम मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभे रहातात. जे श्रवण करून वीर, व सज्जन, संतोष पावून मान डोलावितात ( असें बोलतांना कंठ दाटून आल्यामुळें क्षणैक विश्रांतीनें तो सांवरून )

आर्या.

वाणूं किती मुखें त्या कवितें भांडार शौर्य गुणमणि तो ॥
झाला कविजामाता क्षितिपालनि मूर्तसाच दिनमणि तो ॥ ४४ ॥
बाहुबळें भरतानें करि, केंसरि, कोटि, रीस, बहु वधिले ॥
वधिले तसेच राक्षस मारुनि रुधिरें क्षितीस सुखिकेलें ॥ ४५ ॥

असे असे वीरपुरुष, प्रतापरुद्र केवळ ह्या सोमवंशांत होऊन गेले. अशा पुरुषांचे समागमांत मीं आपल्या तारुण्याचे दिवस घालविले. तशा दिवसांत मला बहुत संकटें आलीं पण त्यांस मी डगलों नाहीं. तशा वीरपुरुषास ज्या ज्या वेळीं बुद्धिवाद सांगण्याचा प्रसंग येई त्या त्या वेळीं मी आपले मनोगत विचार त्यांस कळवीं, ते त्यांस रुचत व त्याप्रमाणें ते आचरणही करीत. माझे यौवनांतही ते मला प्रबुद्ध लेखीत. अशा प्रकारें आयुष्य क्रमीत क्रमीत मी ह्या वयास येऊन पोंचलों आहें. आणि हे तरुण वीरहो, या माझ्या वयानुरूप व माझें कर्तव्य-कर्म समजून मी जो हेतु प्रदर्शवीन त्याचा तुम्हीही अनादर करणार नाहीं असें वाटतें. ( सर्व सभासद अनुमोदन प्रदर्शित

करून पूर्ववत् अवधान देतात ) सांप्रतचे प्रसंगीं मला वाटतें कीं सर्वांनीं एकवटून युद्ध केलेंत. आणि यश घेऊन जें कांहीं धन मिळवून आणिलेंत त्यांतून ज्याचे जसे परिश्रम झालेले आहेत तदनुरूप त्यास बक्षीस मिळालेलें आहेच. त्यापैकीं एकानें दुसऱ्याचे अंशावर नजर ठेवणें रास्त किंवा कसें याची विशेष फोड करून सांगण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. न्यायतत्त्व फार नाजुक, गहन व फारच विचारणीय आहे हें तुम्ही जाणतच आहां. पौरुष अनुलक्षून पहातां कर्ण हा एक वीरमणी आहे. सामान्येंकरून पाहूं गेलें तर सर्व शक्तिमान् प्रभूनें दुर्योधनास आपणा सर्वांहून उच्च पद दिलें आहे तेव्हां त्यांसही केवळ सामान्य व्यक्तीप्रमाणें लेखणें हेंही रास्त नव्हे. अत एव उभयतांनीं शुद्ध अंतःकरणानें पूर्ववत् वागूं लागणें किती आनंददायक होईल बरें! सांप्रत तुम्हास ईशकृपेनें जो मोठेपणा प्राप्त झाला आहे तदनुरूप तुमचे अंगीं सामर्थ्य रहाण्यास तें केवढें जबरदस्त साधन होईल बरें! आणि असें झाल्यानें सर्वांस किती सुखावह होईल बरें! फारच तोषदाई होईल. राजा तुला विशेषेंकरून कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. कर्णासारखा योद्धा तुझ्या पक्षास असणें हें तुला एक भूषण आहे. तो ह्या मिळालेल्या नृपसमूहरूप इमारतीस धैर्यरूपी भक्कम खांब आहे त्याचें सांत्वन करून त्यास पूर्ववत् आपलासा करून घेतल्यानें जगदीशही तुम्हा सर्वांस पराङ्मुख होणार नाहीं. ( इतकें बोलून स्तब्ध बसतो. )

राजा—हे पितामह, आपली आज्ञा शिरसामान्य आहे. पण—

श्लोक.

अती आत्म श्लाघा करी गर्व वाहे ॥
वरिष्ठासि आज्ञा करूं नित्य पाहे ॥
न नीती न आज्ञा असे मान्य ज्याला ॥
अशा उद्धटा वांछिता हो कशाला ॥ ४६ ॥

त्याला वाटतें मी जसें म्हणेन तसें सर्वांनीं ऐकावें. मी सर्वांचा अधिपती, तर अशा वृथा गर्व वहाणाऱ्याचे आज्ञेंत हे सर्व सहाकारी नृप मिळाले आहेत ह्यांनीं आपणा सारख्यांनीं व मीं वागावें कीं काय! असा उन्मत्त, असा द्रेष्टा संग्रहीं ठेवून तो बोलेल तें कोणता चक्रवर्ती सहन करणार आहे. आतां तो एक मोठा पराक्रमी आहे. ही गोष्ट निराळी, ही एक त्याला ईश्वराची देणगी आहे. पण दुसऱ्याचा तो उपमर्द करितो तसें करण्याचा देखील देवानें त्यास पट्टा करून दिला आहे कीं काय! ( इतकें ऐकून घेऊन भीष्म स्वस्थानास निघून जातांच—

कर्ण—रे दुष्टा! नराधमा, कृतघ्ना, आजपावेतों तुझ्या संग्रहीं राहून तुझी तब्बेत संभाळून तुझ्या मर्जीप्रमाणें वागलों त्याचें कायरे हें फळ! बरें. जें झालें तें उत्तम झालें. आजपावेतों तुझ्या संग्रहीं होतों तितक्या कालाची माझ्या योग्यतेनुरूप मी भरपूर पाठवणी पावलों. इतःपर तुझ्या येथें राहून तुझें दास्य करणें हें दुरापस्त आहे. आतां मजपाशीं चंद्रप्रभा

आहे तिलाही पाहिजे तर मी होऊन तिला पाठवून देईन. अ-बलेनिमित्त मला शस्त्र धरावयाचें नाहीं ( कांहीं वेळ स्तब्ध राहून ) काय करूं रे सारे प्रतिबंध गुंडाळून ठेवून आतांच तुला हात दाखवला असता, पण त्या भगवतीनें मला वचनबद्ध करून घेतलें. आणि गतगोष्टीचा विषाद मनांत ठेवूं नको म्हणून आज्ञा केली आहे, तिणें मी बांधला गेलों ! ! !

**कंचुकी**—सरकारचे आज्ञेप्रमाणें सरकारच्या मोर्तब केलेल्या अग्निहोत्रीबावाच्या पत्राची नीट व्यवस्था ठेवण्याची जयद्रथराजास ताकीद देवून रवाना केल्यास दोन घटका झाल्या म्हणोन सरकारच्या कानावर घालण्यासाठीं मामासाहेबांकडून वर्दी आली आहे. ताबेदारास गुन्हा माफ करणार धनी समर्थ आहेत. ( ह्याप्रमाणें वर्दी येतांच दरबार बर्खास्त होऊन सभासद आपापले डेऱ्यावर गेले. )

---

## प्रवेश ५ वा

### राजाचें अंतःपुर.

( आपल्या यजमानणीच्या विरहाचे दुःखानें दासी सचिंतपणें कांहीं वेळ बसून मग एकमेकींशीं बोलूं लागतात. )

**चेटी**—कांग निपुणिके, बाईसाहेबांची तर माहेरीं रवानगी

झाली. पण जाताना त्यांची चर्या पाहिली ती अगदीं फुरगुट-लेली दिसली, ती कां बरें ?

**निपुणिका**—मला नाहीं बाई ठाऊक.

**चेटी**—अग सांगसना कां पण. तूं अष्टोप्रहर त्यांचे जवळ असणारी म्हणून विचारत्यें. सांगितलंस तर मी का डांगोराच का पिटीन अगदीं. मला समजतच का नाहीं अगदीं.

**निपु०**—बाई तें सांगण्यासारखं नाहीं हो कांहीं.

**चेटी**—नाहीं सांगत तर नाहीं. माझा त्यावांचून कांहीं खोळंबा आहेसें नाहीं. बायका माहेरी जाऊं लागल्या म्हणजे माहेरची कितीही गरिबी असली तरी त्यांना खुशालीच वाटते आणि चेहेरा प्रफुल्लित दिसतो. तसा ह्यांचा नव्हता म्हणून विचारलें.

**निपु०**—झालंच तसं. मग तोंड हिरमुसलें होईना तर काय होईल ?

**चेटी**—तेंच तुला विचारलं काय तें, पण तूं त्याचा अगदीं बाऊ करून ठेवला आहेस. नको सांगूंहो बाई.

**निपु०**—अग त्यांना न्यायला आले नवतेन कांहीं नवते, त्यांना, सरकार, अग्गबाई ! अग उठ, जा जा लौकर. तिकडे पाहिलंस का !

**चेटी**—अग्गबाई ! खरंच, आज सरकार स्वारी लौकर आली ! असें बोलून धांवत आपल्या देवडीशीं पोंचते तों तेथें राजा दाखल झाला त्यास मुजरा करते तों ती देवडी वलांडून

राजा महालांत येऊन एका मंचकावर बसून लोडाला ओटेंगून छताकडे नजर लावून खिन्न मुद्रेनें पडला. व कांहीं वेळ लोटल्यावर आपल्याशींच. आज स्वारी कोठें गुंतली असावी बरें! मी महालांत आल्याचें कळलें नाहीं वाटतें अजून. (कांहीं आणखी वेळ लोटल्यावर पुन्हां आश्चर्यानें) काय? अद्याप मी महालांत आलों हें कळलें नाहीं!! कांग, निपुणिके, तुला दिसलें नाहीं कां अजून!

**निपु०**—सरकारच्या पायाची बटीक येथेंच हजर आहे.

**राजा**—हा दुष्टे! अद्याप येथेंच हजर आहे म्हणून सांगतेस. तुझी मालकीण कोणत्या नादांत गुंतली आहे आज?

**निपु०**—जी, सरकार आज बाईसाहेब माहेरीं (रडण्याचे स्वरानें मुसमुसत अर्धवट बोलत्ये.)

**राजा**—काय सेवकजन मूर्ख आहेत! स्पष्ट बोलतां देखील येत नाहीं. हूं नीट बोल काय तें.

**निपु०**—सरकारचा विजय असो. या बटकीला माफी असावी. मामाजींनीं बाईसाहेबांची माहेरीं रवानगी केल्यास सुमारें साडेतीन प्रहर झाले.

**राजा**—काय बोललीस? रवानगी केली.

**निपु०**—जी सरकार.

**राजा**—कोणीकडे रवानगी केलीग. तूं कांहीं भांगबींग तर खाल्ली नाहींसना? नीट शुद्धीवर येऊन बोल. घाबरू नको.

**निपु०**—जी सरकार बटकीला माफी असावी. सरकार-

च्या आज्ञेनें मामाजीनी बाईसाहेबांस माहेरीं रवाना केलें. बरोबर संरक्षणार्थ जयद्रथ महाराजास पाठविलें आहे.

**राजा**—याप्रमाणें दासीचें भाषण ऐकतांच स्तब्ध बसला आणि एकाएकीं दुःखाचा निश्वास टाकून हा प्रिये !!!

**साक्या.**

चंपक कलिके हा गुणराशी कोठें तुज मी पाहूं ॥
विरहाचेंगे दुःख तुझ्या गडे सांग कसें मीं साहूं ॥४७॥
नाहीं चुकलों तुझिया वचना सत्वर पूर्ण कराया ॥
ऐसें असतां सांग मजवरी कांगे पातळ माया ॥ ४८ ॥
पल्लव मृदु परि शय्याही मज भासति केतकि कांटे ॥
तुजविण सखये रंगमहाल हा, शून्य स्मशान वाटे॥४९॥
मंचकि बसतां सर्वेचि टाकुन तांबुल मुखि तूं देशी ॥
या दासावरि निष्ठुर होउनि टाकुन गेलिस कैशी ॥५०॥
मंदिरिं येतां प्रेम कटाक्षें जेव्हां पाहशि मजला ॥
कटाक्ष नोहे भासे मज जणु सायक हृदयी खचला ५१
रणामधीं बहु घाय सोशिले परि हा न सोसवे बाण ॥
व्याकुळ होतां गाढालिंगानें वांचविशी हे प्राण ॥ ५२ ॥
सौदामिनि परि चंचलता तुझि स्मरतां नयन भरावे ॥
गुण आठवितां वाटे दासा तुझ्याच मागें यावें ॥ ५३ ॥

(अशा प्रकारें शोक करतां करतां मूर्छित पडतो.)

**निपु०**—सरकार ह्या दासीनें उदक आणिलें आहे ह्याचें ग्रहण करून व हें डोळ्यांस लावून सावध व्हावें. आपण असा

शोक कराल तर मग माझी मालकीण मला टाकून गेली म्हणून मी किती शोक करावा बरें सरकार! सावध व्हा सावध व्हा.

**राजा**—कशीग तूं मूर्ख अशी! मी शोक करतों आहे काय?

**निपु०**—सरकारच्या अंगावरचें उपवस्त्र व झगा ही भिजून चिंब झालीं. हीं बदलण्याकरितां जयंधरास पाचारण्यास ह्या दासीस आज्ञा व्हावी.

**राजा**—काय जामा भिजला! (हातानें चांचपून) हो खरेंच. बरे जयंधर कशास पाहिजे. तूच दुसरा आणून दे म्हणजे झालें. मला घालतां येईल.

**निपु०**—हा ह्या बटकीनें दुसरा जामा हजर केला आहे.

**राजा**—(जामा घेऊन उरफाटा घालूं लागतो व एकीकडे) निपुणिके मला थोडेंसें वाईट वाटलें खरें पण तशीच तुझी मालकीण होती कीं नाहीं सांग बरें!

**निपु०**—सरकार ह्या बाहींत उजवा हात घालावयाचा. तो नव्हे, तो नव्हे, उजवा, उजवा हात.

**राजा**—(दासी सांगते ते ऐकण्याचें भान न रहातां) सांगग सांग तुझी मालकीण कशी होती ती सांगग मी तुझ्या पायां पडतों.

**निपु०**—जी सरकार, आपण भलतेंच कसें बोलतां मी आपली दासी आहें. मी सर्व सांगतें आपण सावध व्हा. ह्या बाहींत उजवा हात घालावा.

**राजा**—( भांबावून ) काय ! ही उजवी नाहीं. (तींत डावा हात घातलेला जसाचा तसाच असतां पूर्ववत्).सांगग निपुणिके सांगग.

**निपु०**—जी मायबाप. बाईसाहेबांचे गुण आठवून सारें शहर हळहळतें आहे. अद्याप तोंडांत पाणी घालण्याचे देखील कोणास भान नाहीं. (इतकें ऐकतांच राजा मोहग्रस्त होऊन स्तब्ध बसला, व तसाच बसला असतां मूर्च्छा येऊन पडला व पहिल्यानें मूर्च्छित झाला होता त्याहूनही फारच बेशुद्ध झालेला पहातांच दासीनें घाबरून किंकाळी फोडली ती ऐकतांच)

**कंचुकी**—( राजा अस्ताव्यस्त व मूर्च्छित पहातांच ) इडापिडा टळो अमंगळ पळो, महाराजाचा जयजयकार असो. असा मुजरा करून झारीनें थोडेंसें पाणी राजाचे तोंडांत घालून व डोळ्यांस लावून वारा घालीत बसला.

**राजा**—( कांहींसा सावध होतांच ) निपुणिके, निपुणिके सांगग.

**कं०**—सरकार सावध व्हा, सावध व्हा, निपुणिका नव्हे, मी ह्या पायांचा चाकर आहें. महाराजांनीं इतकें मोहांत पडणें हें आह्मा मूढांसही बरें दिसत नाहीं.

**राजा**—काय, मी मोहांत पडलोंसें तुला वाटतें ? उं: तें असो. पण तुझी मालकीण अद्याप कां, अंह: कोण कशी होती रे.

**कं०**—( कंठ सद्गदीत झाल्यामुळें थोडा दु:खार्त स्वरानें ) सरकार बाईसाहेबांचे वियोगानें सारें शहर अद्याप हळहळतें

आहे. अशी सुस्वभावाची मालकीण मिळाली होती, पण आमचें दुर्दैव, आह्मांस सुखानें कोठें भाकर खाऊं देईल. तें जोड्यास तेल घालून जोडा चढवून आमचेपुढें दत्त म्हणून उभें आहेच. बाईसाहेब आह्मास जितक्या प्रेमानें वागवीत होत्या तसें पोटच्या लेंकरास वागविणाऱ्या आया देखील थोड्या.

**राजा**—खरेंच कारे! तुमच्यावर तिची इतकी माया होतीना! कांहीं वेळ खिन्न बसून एकाएकी.

**पद.**

प्रिये मी शरण असे तुजला ॥ कांगे त्यागिशि तूं मजला ॥ध्रु०॥
हौसेनें म्यां तुज करिं धरिलें ॥ तुझिया वचनातें पाळीलें ॥
जीवित तुजला म्यां वाहीलें ॥ नाहीं हित अनहित पाहिलें ॥
पत्निचा रोष सहन केला ॥ कांगे त्यागिशि तूं मजला ॥ १ ॥
प्राणापरीस तुजवरी ॥ प्रीती धरिली आजवरी ॥
सभासदांच्या भरि भरलों ॥ तुझिया प्रेमातें मुकलों ॥
भूललों व्यर्थ न्याय जाला कांगे० ॥ २ ॥
तुजविण झालें चित्त उदास ॥ देती सर्वहि गात्रें त्रास ॥
जाणुनि कोण्या अपराधास ॥ सखये दास मोकलिशी ॥
विनवितां कंठ कसा सुकला ॥ कांगे० ॥ ३ ॥
मज ह्या शोकाब्धींत तरी ॥ तुजविण कोणि नसे दुसरी ॥
भेटिची आस नसे उरली ॥ वाटे आयुर्मिति सरली ॥
होगे सत्वर जिवनकला ॥ कांगे त्यागिशि तूं मजला ॥ ४ ॥

हा प्रिये! काय दुःख हें. असा उद्गार काढून स्तब्ध ब-

सतो तों डोळे भरून येऊन टपटप आश्रू गळूं लागले. असें पहातांच—

**कं०**—सरकारचा जयजयकार असो. सरकारासारख्या चक्रवर्तींनी दुसमानाकडून आसवें टाकवावीं; तें एकीकडेच राहिलें आणि तद्विपरीत प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो हें बोलून दाखविण्यास फार वाईट वाटतें.

**राजा**—कायरे मी शोक करतोसें तुला वाटतें काय ?

**कं०**—ताबेदाराची तसें बोलण्याची मगदूर नाहीं. जामा नीट चढविण्याची सेवकास परवानगी मिळावी.

**राजा**—काय ! जामा देखील नीट चढविलेला नाहीं. (हातानें चाचपून पाहून) खरेंच, बरें तर चढीव नीट. आज सभेंत कर्णाशीं जें भाषण झालें त्याकडे लक्ष्य गेलें होतें त्यामुळें चित्त थोडें व्यग्र झालें होतें. तो इतका उद्धट असेलसें वाटत नव्हतें. असा दांडगेपणा कोणत्याही मांडलिकाचे अंगीं असेलसें वाटत नाहीं.

**कं०**—सरकार, कितीही उद्धट, दांडगा, बलाढ्य असला तरी करतो काय ? महाराजाचेपुढें कोणाची मात्रा चालायची नाहीं. अखेर अखेर तर महाराज अगदीं गुंग होऊन गेले होते. कांहीं सुचेनासेंच झालें नि काय.

**राजा**—काय ! मी गुंग होऊन गेलों होतों म्हणतोस ?

**कं०**—सरकारचा विजय असो. ताबेदारास कसूर माफ असावा. अंगराजासही महाराज म्हणण्याचा आमचा पेशा

आहे. पण सरकार काल तर महाराज अगदीं हिरमुसलेच झाले. कांहींच चालेनासें झालें.

**राजा**—झालें आहे कुठें अझून. जें व्हायचें तें पुढेंच आहे अद्याप. पाहूं आतां त्याच्यांत कितपत धमक आहे ती. सुंदरकास आणि बुधकास हांक मार.

**कं०**—जी आज्ञा सरकार.

**सुंदरक**—ह्या चरणांचे सेवक हजर आहेत. महाराजांचा जयजयकार असो.

**राजा**—सुंदरका तूं आणि बुधक असे कर्णाच्या शिबिरास जा आणि कर्णास सांगा कीं, तुजपाशीं जी चंद्रप्रभा दासी आहे तिजवर स्वामित्व माझें आहे. यास्तव तिला मजकडे लौकर पाठवून दे. नाहीं तर मी खुद्द तुजवर स्वारी करीन, आणि त्या दासीला तुझ्या कवेंतून ओढून आणीन. असेंच सांगा बरें. आणि त्या चंद्रप्रभेस लौकर घेऊन या.

**सुंदरक**—जी, आज्ञा सरकार. ( असें बोलून महालाच्या बाहेरच्या अंगास येतांच ) कांहो ! बुधाजी, आतां सरकारानें फर्माविलेला हुकूम तर मोठा करडा आहे. ह्याचा परिणाम तुह्माला कसा वाटतो ? मला तर सरकारच्या तोंडचीं तीं अक्षरें ऐकल्यापासून फारच वाईट वाटतें बुवा.

**बुधाजी**—मलाही तुमच्याचसारखें झालें आहे. पण उपयोग काय ? आपल्याला बरें न वाटलें तरी आपलें सांगितलेलें ऐकणार कोण. मघां त्या अजाबानें का थोडी कान उघडणी

केली पण सारें व्यर्थ झालें. बरें जें झालें तें ठीक. पुढें कसें करावें.

**सुंदरक**—अहो कितीही झालें तरी आपण ताबेदार माणसें आपण आपली कामगिरी बजवावी इतकें मला दिसतें. मग तुह्माला कांहीं शक्कल सुचेल तर न जाणो.

**बुधाजी**—तुह्मी म्हणतां तसेंच करायचें चला तर ( दोघेही निघून जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

### स्थळ—कर्णाचा महाल.

( उभयतां राजदूत कर्णाच्या शिबिरास येऊन दाखल झाल्यावर )

**सुंदरक**—कांहो, बुधाजी, आतां कसें ? महाराजाची वृत्ति तर अगदीं उदास, कांहीं चिंताग्रस्त, व कांहीं रागांत, अशी दिसत आहे. समशेरीवर हनुवटी टेंकून ज्या ऐटीवर स्थिरावले तीच ऐट अद्याप आहे. मी येथें आल्यापासून तिकडेच लक्ष ठेऊन आहें. पण त्या ऐटीवरून हलले देखील नाहींत. अशा वेळीं पुढें होऊन तसला भयंकर निरोप ह्या महाराजास कळविण्याची आपली तर छाती होत नाहीं. मग तुम्ही कांहींही म्हणा. पुढें तुम्ही व्हाल तर पहा. मी तुमच्या मागेंच आहें.

**बुधक**—मी तर हिमतीचा कितपत आहें, हें तुम्हाला ठा-

ऊकच आहे. तशांत ह्या महाराजापुढें जाण्याचा मला हा प-
हिलाच प्रसंग. पण आपण कोणीच पुढें न होतां असेच उभे
राहूं. आणि जेव्हां आपलेकडे नजर वळून हुकूम फरमावि-
तील त्याप्रमाणें वागतां येईल, ( असें ते अपसांत बोलताहेत हें
कर्णाचे कानीं चुटपूटतें जातांच. )

**कर्ण**—अरे सुंदरका, तुम्ही दोघेही पुढें या. तुम्हास तुम-
च्या राजानें कशाकरतां पाठविलें आहे तें मी मघांच समजलों.
पण तुमच्याजवळ त्यानें काय सांगितलें तें ऐकण्याची इच्छा
आहे. तुम्ही आला हे संतोषानें आला नाहीं हें तुमची चर्या-
च सांगते. पण तुमच्या पेशाप्रमाणें तुम्हांस येणें भाग झालें हे
ही उघड दिसतें.

**दो० दूत**—महाराजांचा विजय असो. असा मुजरा करून
खालीं मान घालून उभे रहातात.

**कर्ण**—कारे, कां बोलाना काय निरोप असेल तो ?

**दो० दूत**—सरकारचा विजय असो. असा मुजरा करून
म्लान वदनानें पूर्ववत् उभे रहातात.

**कर्ण**—कोण आहेरे तेथें.

**जयंधर**—महाराजांचा विजय असो.

**कर्ण**—सुबुद्धी प्रधानास जाऊन सांग कीं, चंद्रप्रभेला दुर्यो-
धनाचे पाचारणाकरून तिला त्याजकडे पाठवावयाची आहे.
म्हणून तिजकडून जाण्याची तयारी करवून लौकर तिला घेऊन
ये असें सांग.

**कर्ण**—दूतहो! तुम्हीं जो निरोप घेऊन आला त्यावद्दल-चा दोष सर्व तुमच्या राजाकडे आहे. दूतहो! तुमचा राजा अन्याय करीत आहे, हें इहलोकीं तुम्हीं पहात आहां व स्वर्गाहून देव पहात आहेत. तुमच्या राजास मजकडून सांगा कीं, प्रस्तूत जो तूं अन्याय करीत आहेस ह्याचा लौकरच तुला पश्चात्ताप होऊन तूं माझ्या मिनता करूं लागशील पण मग मी अगदीं पाषाणहृदय होईन आणि तुजकडे ढुंकूनही पाहणार नाहीं, तेव्हां तुझे डोळे उघडतील असेंच अक्षरशः सांगा बरें.

**जयंधर**—महाराजांचा विजय असो, आज्ञेप्रमाणें प्रधानजी, बाईसाहेबांकडून तयारी करवून त्यांसह येत आहेत, आलेच समजायचें, पण जातांना सरकारच्या चरणाचें दर्शन घ्यावें, आणि जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें करावें, अशी बाईसाहेबांची इच्छा असल्याचें सरकारचे कानावर घालण्याची आईसाहेबांची मला आज्ञा झालेली मी महाराजांचे कानावर घालण्याची परवानगी मागून घेतों माफी असावी.

**कर्ण**—जयंधरा, चंद्रप्रभेची इच्छा मी समजलों नाहींसें नाहीं. मी, तिचा त्याग करावा अशा हेतूनें पाठवून देतों असें नाहीं. चंद्रप्रभेची आणि माझी नजरानजर झाली तर देखील मला भान न राहतां प्रतिज्ञा भंगाचाच प्रसंग येईल, तो न यावा म्हणून मीं मनोनिग्रहानेंच, जें सांगणें तें प्रथमच सांगितलें आहे. (हा सर्व संवाद डेऱ्याचे बाहेरच्या अंगास चंद्रप्रभा

आलीच होती तिचे कानीं पडतांच जेथें ती होती तेथून हल-
ण्याचें देखील तिला त्राण नाहींसें होऊन)—

**चंद्रप्रभा**—शिव! शिव!! हे जगन्निवासा!!! अनाथनाथा देवा! या अजाण अबलेवर कायरे हा गहजब! देवराया! जन्मापासून मजवर दुःखाचा वर्षावच होत आला. ह्यावरून पूर्वजन्मीं मजपासून कांहीं तरी महान पाप घडलें असावें म्हणूनच माझा असा छल होत आहे. ह्यांत शंका नाहीं. काय दोष घडला असेल तो देवा तूंच जाणें! अशा दुर्धर प्रसंगीं तुजवांचून मला कोण त्राता! अहारे नशीबा! तूं तर अगदीं शर्थ केलीस! जेथें पहावें तेथें तूं पुढेंच आहेस. आम्हा गरीब अबलांची तुला कशीरे नाहीं दया येत? असें बोलून विव्हळ होऊन पडून रहाते. व कांहीं थोडा वेळ लोटतांच एकाएकी.

## पद.

कशि दैवाची गती कळेना दुःखें साहूं किती, दयाळा पावें लक्ष्मीपती ॥ ध्रु० ॥ बाळपणी ती माता मेली पितृव्यें मज पाळिलें ॥ पित्यानें नांवच तें सोडिलें ॥ द्वादश वर्षें वयास पुरतां ताता गहिवर आला ॥ बेत लग्नाचा मांडिला ॥ त्याचि सरली आयुर्मिती ॥ दयाळा पावें लक्ष्मीपती ॥ १ ॥ सुहृदे सारीं दुःखित परि मोठा ज्याचा भ्रम ॥ नगरांत मातली धुम ॥ द्रव्याचे कोश भरूनि नेले ॥ सर्वापरी दीन केलें ॥ न कळे आप्तांची गती ॥ दयाळा० ॥ २ ॥ मजला पहातां चडीउडीनें धांवियले सैनिक ॥ म्हणती हें रूप अमोलिक ॥ नृपातें मात क-

ळली ॥ वैऱ्याची मग गति हरली ॥ मज न कळे स्त्रियांची स्थिती ॥ दयाळा पावें० ॥ ३ ॥ द्रव्यविभागासवें नृपानें कर्णातें मज दिलें ॥ तातें जणु पदरीं बांधिलें ॥ पातिव्रत्या स्मरुनि राहिल्ये तत्पर शेवेप्रती ॥ कशीही आज झाली गती ॥ देवा ! दे कर्ण वर निश्चिती ॥ दयाळा पावें लक्ष्मीपती ॥ ४ ॥

देवा ! धनुर्धरामध्यें जो अग्रगंण्य, सामर्थ्यानें व वैभवानें जो प्रतिचक्रवर्ती, त्या अंगराजाची मी प्रिया असतांना मजवर असा घोर प्रसंग ! तोही अंगराजाचे जिवमान काळांतना ! वारे नशिबा ! वाः कमाल झाली आतां या संसारसुखाची ! ( असें म्हणत म्हणत मूर्छित पडते. )

**सुवदना**—इडापिडा जावो बाईसाहेबांस सुखाचा दिवस येवो अन वैऱ्याचें निर्मूळ होवो. ( असें बोलून मोठ्या आवेशानें आपल्या आंखावर बोटें मोडून आपल्या डाव्या पायाखालची माती घेऊन ती चंद्रप्रभेवरून ओंवाळून टाकते व झारींतलें पाणी घेऊन चंद्रप्रभेचे डोळ्यांस लावून वारा घालींत ) देवा माझ्या मालकिणीवरलें हें संकट निवारण करणार तूंच समर्थ आहेस !

**सुबुद्धी**—बाईसाहेब ह्या आलेल्या प्रसंगाचा परिणाम घोर तर न व्हावा म्हणून भगवतीनें महाराजांस भर सभेंत दर्शन देवून त्यांचें वचन घेतलें आहे, तें कायम राखणें आपलें हातीं आहे. आणि आपण क्षत्रियाचे कुळांत जन्म घेतलात आणि क्षत्रियाशींच आपला शरीरसंबंध झाला आहे, आणि प्रतिज्ञा

पाळण्याचे भूषणाचें महत्व खरेंच केवढें आहे हें आपणांसच चांगलें अवगत आहे, हें जाणून चरणास विज्ञप्ति केली आहे. (याप्रमाणें प्रधानाचें भाषण ऐकतांच थोडक्यांत तिनें आपलें मन घट्ट केलें. भरतें आलेलें तसेंच आंगीं वसत होतें तरी प्रधानास वडिलांप्रमाणें मानून. )

**श्लोक.**

करितां प्रणाम वलयें पुढलीं गळालीं ॥
रडतांहि कांति मुखिची सगळी उडाली ॥
श्रमतांहि पाय अगदीं बलहीन झाले ॥
उचलोनि ठेविति रथीं रथ मंद चाले ॥ ९४ ॥
सिंव्हावलोकन करी पथ चालतांना ॥
आज्ञापिना पुसत वाहक वाहताना ॥
वाटे बहू परिहि दुःख जिच्या मनाला ॥
दाटूनि कंठ रडुनी कळवी जनाला ॥ ९९ ॥

अशा स्थितींत चंद्रप्रभेस रवाना करून प्रधान प्रभृती खिन्न व उद्वास होत्साते परत दरबारांत आलेले पाहून कर्णास फारच खेद वांटून तो अगदीं स्तब्ध बसला. व अशा स्थितींत कांहीं वेळ लोटल्यावर (एकाएकीं उठून वैतागल्याप्रमाणें एकटाच गंगातीरानें तडक चालत आहे, स्फुंदत स्फुंदत रुदन करीत असल्यामुळें आश्रुपातानें व घामानें वस्त्रें चिंब होऊन गेलीं आहेत. वांवटळीच्या योगानें आंगावर व वस्त्रांवर धूळ उडाल्यामुळें शरीराची कांती मलिन झाली आहे, व सर्व चित्त अपमान दुःखानें

ग्रस्त झालें आहे असा, समुद्रथडीस प्राप्त होतांच थोडा वेळ वचकून) समुद्रास लक्षून—

पद.

हा क्षीराब्धे हरे बापा पाव मला झडकरी दयाळा कृपा करि लौकरी ॥ ध्रु० ॥ सकल हेतु ते पूरित कर्ता ऐशी कीर्ति तुझी ॥ दयाळा राखि लाज माझी ॥ याचकवृत्ती धर्म न माझा पारि झालों मी याचक आळ पुरवुनि दाविजना कौतुक ॥ नेली माझी अंतुरी ॥ दयाळा साह्य करि लौकरी ॥ १ ॥ संकट समयीं देवा नीत्या प्रार्थियले तुजला, तयांचा हेतु पूर्ण केला ॥ मंथन समयीं विष प्रेषुनियां दैत्यांतें जाळिलें ॥ पीयूष सुरां पाजिलें ॥ ऐसे तूझे थोर पराक्रम दीन मी वर्णू किती ॥ वर्णितां शिणातिल वाचस्पती ॥ कुरुपति मोठा जगीं दांडगा करितो अनयातें ॥ नाहीं अवगत नय त्यातें ॥ दमन कराया शक्ति असुनही हीनबल मी झालों ॥ अंबेशी वचनीं गुंतलों ॥ अवमान जाळितो भारी ॥ दयाळा कृपा करि लौकरी ॥ २ ॥

काय ! इतका काकुळतीस येऊन मी केव्हांचा यास विनवितों आहें तरी ह्यास द्रव येत नाहीं काय ! ह्याची निष्ठुरता पाहून वडिलाची म्हण "कठिण समय येतां कोण कामास येतो." आहे तिचें स्मरण करण्याचा प्रसंग यावा काय ? हर हर ! पण आपण असा खेद करणें सर्वांशीं रास्तसें मनास वाटत नाहीं. कारण जे कृत्य पाया शुद्ध नसतें त्याची सिद्धीही तितपतच होते; असें म्हणतात त्याप्रमाणें मजकडून प्रमाद झा-

त्यामुळें समुद्रास माझी दया आली नसेल. तर आतां प्रथम आपल्या मातोश्रीस नमण्यापासून आरंभावें हे वरें, कारण न-मातुः परदैवतं अशी स्मृति आहे तिचा तरी साक्षात्कार पाहूं—

श्लोक.

देवी तुझ्या नमुनि मी पदपंकजातें ॥
प्रार्थीतसे सुत तुझा वृष पाव यातें ॥
देवें दिला वर तुला मम जन्मकाळीं ॥
शौर्यें मदंत समरीं लिहिला कपाळीं ॥ ५६ ॥
देवोनियां तदनुसारचि पौरुषातें ॥
ईशें दिलें क्षणिक वैभव तेंही मातें ॥
इच्छा नसे मज तशी चिर वाचण्याची ॥
आहे जशी सुचिर कीर्ति करावयाची ॥ ५७ ॥

आर्या.

शौर्यें दुःख निवारण करण्याचा समय जेधवां आला ॥
प्रेषुनियां भगवतितें सांग तयीं कां निवारिलें माला ॥५८॥
तैं दिधलें वचन तसें सत्य न केलें कसेंच अद्यापी ॥
सम दोघे देवाला देवि कसें तेधवा ति आज्ञापी ॥५९॥
बहु अभिमान नृपाला देवा तरि का न घेच हेतीला* ॥
हारवुनी मम विक्रम भूप न कां ने मदीय दासीला ॥६०॥
नेली दासी तरि त्या दासीची मज नसे तशी पर्वा ॥
परि त्या भूपमुखानें ऐकू न शकेंच मानहानि रवा ॥ ६१ ॥

* तरवार.

जरि कांहीं दीन तरीं वांचावा सुत असें तुला वाटे ॥
दे दर्शन सत्वर तूं आशेनें नेत्र लाविले वाटे ॥ ६२ ॥
साहुनि अवमानातें शक्य न वांचावया तुझा तनया ॥
येवोनिगे त्वरेनें पाहिं कसा होतसेचि हा अनया ॥ ६३ ॥
माते धांव अतांगे धांव अतां धांव लौकरी धांव ॥
ऐशा संकट समयीं सांग दुजा प्रार्थु कोण मी देवा ॥६४॥

(याप्रमाणें कर्ण विलाप करीत असतां वारें भयाण सुटलें, समुद्रांचें पाणी उचंबळून चढूं लागलें, दिशा धुंद होऊन मोठा गंभीर, मेघगर्जनेसारखा शब्द होऊं लागला, आणि समुद्रांत स्तंभप्राय धूम्र वर्णाकृती दिसूं लागली आणि त्यांतून कर्णाची आई जलदेवतेच्या रूपानें प्रगट होऊन.)

जलदेवता—बा, अंगराजा ईश्वर तुला सुखी ठेवून चिरायू करो. बाळा मी समुद्रतळीं तुझ्या पणज्याच्या मंदिरांत आप्तवर्गासहवर्तमान आनंदांत निमग्न होत्यें, तेथें तुझा आर्तस्वर कानीं पडतांच मन कळवळलें. आणि लागलींच वडिलांची परवानगी घेऊन निघून आलें. सांप्रत तुजवर कोणतें संकट येऊन पडलें आहे तें ऐकूं दे.

कर्ण—मातोश्री मी नमस्कार करितों. मातोश्री तुला सर्व विदीत असतां माझ्या मुखानें तें वदवावें असा तुझा मानस दिसतो. तर मी कळवितों ऐक.

श्लोक.

इंद्रप्रस्ता सर करुनिया शत्रु जिंकोनि यत्नें ॥

नाना रत्नें अमित अणिलीं त्यांत तीं दोन रत्नें ॥
मीनाक्षी ही तशिच दुसरी रूप लावण्य राशी ॥
नामें साजे शशिकर प्रभा होय ती माझि दासी ॥६५॥

आर्या.

बहु मत वादें झाला ज्या भागा योग्य तोच वीरमणी ॥
त्या मानें भूपाला मीनाक्षी प्राप्त होय हीरकणी ॥ ६६ ॥
काल बहुत न गेला मीनाक्षी तात मागण्या आला ॥
द्रव्य समर्पुन भूपा विनयें बहु रीति प्रार्थिता झाला ॥६७॥
विप्र वचन ऐकुनियां सर्व सभाजन नृपास विनवीती ॥
मीनाक्षी देउंनिया तृप्त करा, विप्र, हीच, शिव रीती॥६८॥
झिटकारुनि सर्वांतें, राज्यमदें, बहुत, विप्र, हेटाळिला ॥
विप्रें अराध्य दैवत दुःखार्तें धुंडिराज तो स्तविला ॥ ६९ ॥
विघ्नेशें क्षोभुनियां केला बहु नाश मारिले शतशा ॥
तापचि तैं बहु झाला देती यमदूत पंक्तिहीन तशा ॥ ७० ॥

श्लोक.

समस्त नृप जाहले तयीं बहूतसे घाबरे ॥
वृथैव क्षय ना कळे किमपि बीज त्याचें खरें ॥
भविष्य कथिते भले सुजन जाणते आणुनी ॥
तयांस पुसिलें स्वयें त्वरित बोलण्या शोधुनी ॥ ७१ ॥
नृपा बहुत भीतिते न धजति स्पष्ट बोलावया ॥
धरूनि सरसावलों असि तयांस रक्षावया ॥
तयीं निपुण ज्योतिषी कथिति दोष तो शोधुनी ॥

सर्वांचि मग ऊठला नृप सुयोधन क्षोभुनी ॥ ७२ ॥
क्रोधा. भूप चढे, वहू कडकडे, धाडा म्हणे, बापडे ॥
रागे फार कढे, मनीं चरफडे, दे द्रव्यही रोकडें ॥
होमा लागि पुढें मुकामिच पडे ऐसेच वाडे कडें ॥
मीनाक्षीस पुढें करी न विघडे वारी असें साकडें ॥७३॥

आर्या.

माझी हिरोनि दासी नेइ जसा अविस लांडगा साच ॥
पाहीना न्यायातें दुर्योधन दुष्ट दांडगा साच ॥ ७४ ॥

मातोश्री रणांत मी महान महान वीर जिंकिले, कित्येकांस हतवीर्य केलें; त्या दुष्ट दुर्योधनाचें प्राणापरीस विशेष मनःपूर्वक रक्षण केलें, व त्याचे मर्जीप्रमाणें वागून त्यास साहाय्य दिलें. समरांगणांतल्या तुझ्या पौरुषानुरूप बक्षीस देण्यासही एक चंद्रप्रभा कांहीं अंशी आहे. हिचा तूं अंगिकार कर म्हणून खुद्द राजानें चंद्रप्रभा मला दिली. असे असतां त्या कपटपटूनें माझी मानहानी करून माझी दासी परत घेतली. अशा प्रकारें मी तुझा पुत्र अपमान दुःखानें गांजलों आहें. ह्या माझ्या दुःखाचा प्रतिकार कर. अथवा मी भगवतीशीं वचनांत गुंतलों आहे त्यास बाध न येतां त्या दुष्टाचें पारिपत्य करण्याचा मार्ग दाखीव.

जल्देवता—अंगराजा तुझ्या दुःखाचें बीज मला कळलें. तूं आतां खेद करूं नको मला पंचतत्वें अनुकूल आहेत. त्यापैकीं कोणत्याही एका तत्वाच्या अधिपतीस मी सांगेन तर तो किंवा माझ्या सहजन्या जल्देवतांस हा वृत्तांत कळवीन तर

त्याही आपल्या सामर्थ्यानें तुझ्या शत्रूचें आरमार बुडवून त्याचा नाश करण्यास त्याही समर्थ आहेत. आतां तुझ्या शत्रूच्या नाशास प्रवृत्त होण्यास माझें चित्त उतावीळ झालें आहे. आतां मीं स्वस्थानी जातें. आणि होईल त्या उपायाची योजना तुझ्या शत्रूचे शासनास करतें.

**कर्ण**—मातोश्री मला आणखी कांहीं सूचना करण्यास परवानगी असावी.

**जलदेवता**—वत्सा, बोल काय तें.

**कर्ण**—एका काळीं कांहीं नाजूक व सूक्ष्म कारणांवरून देवदानवांचा कलह लागून तो वाढतां वाढतां अगदीं विकोपास गेला, तेव्हां दानवांनीं एकवटून देवनाथाचे नाशास्तव कांहीं विभू रचला, त्याचा वृत्तांत माझे मातामहाचे द्वारें तुला कळतांच, तो सुरपतीस तूं गुप्तरूपानें कळविलास त्यावरून सहस्रनयनानें त्या दानवाचे पारिपत्य केलें.

**जलदेवता**—बरें तसें झालें होतें पण त्याचा येथें काय संबंध?

**कर्ण**—ज्या दानवांचा मनोभंग झाला होता ते सर्व एकवटून कुरुपतीस ह्या समयीं मिळाले आहेत; आणि माझा छल करून तुला दुःख द्यावें. असा त्यांचा मानस असल्याचें मला कळलें आहे. ह्या कारणानें माझे शत्रूचा नाश करण्यास प्रवृत्त होण्यास देवेंद्रास प्रार्थून अनुकूल करून घेतल्याविना माझ्या शत्रूस शासन करण्यास तूं जे जे यत्न करशील त्यास यश प्राप्त होण्यास शंका वाटतें.

जलदेवता—ही गोष्ट तूं आपले मतें मला यथाकाळीं सुचविलीस हें बरें केलेंस सांप्रतकाळीं भक्तमनोरथ परिपूर्ण करण्या निमित्त देवेंद्र मर्त्यलोकीं संचरले आहेत, व एकादश रात्रीं ह्या भूतलावर विहार करण्याचा देवनाथाचा संकल्प आहे. देवेश्वर आपल्या स्थानीं प्राप्त होतांच मी त्यांचे दर्शनास जाईन. तिकडून मी परत येई पावेतों तूं कोठें व केव्हांही रणभूमीस अगर सभेंत संचार करूं नको. आपल्या सैन्यासह मणिपुरापासून दूर अंतरावर तळ देऊन ऐस, ही तुला माझी आज्ञा आहे. आतां मी स्वस्थानास जातें.

अंक दुसरा समाप्त.

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

स्थळः—सुंदरवन.

हरीपूर गणेशपूरच्या सीमेपावेतों सर्व सुखरूप पोंचतांच जयद्रथानें विश्वंभर दिक्षितास सुचनेकरितां जासूद पाठविल्यावरून.

विश्वंभर—जनार्दना, तूं आपले स्वाध्यायास बरोबर घेऊन

मीनाक्षीस पोंचविण्याकरितां सिंधुराजाचा पुत्र जयद्रथ आला आहे, त्यास सामोरा जा; आणि मोतीबागेंत त्यास उतरण्यास जागा दाखीव, व सर्व टापटीप नीट ठेव.

**जनार्दन**—आज्ञा महाराज, ( असें बोलून स्वाध्यायांसह तिकडे जातो. )

**जयद्रथ**—( ऋषीसमाज आपलेकडे येतोसें पाहून ) पांचालका, दिक्षितबावांस नुसतें कळीव म्हणून सांगितलें असतां त्यांस व्यर्थ कां श्रमविलेंस बरें.

**पांचालक**—महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणेंच मी वर्तन केलें. हा ब्रह्मसमाज आपल्याकडे येत आहे. ह्यांत ते अग्निहोत्री महाराज नाहींत. त्या अग्निहोत्रीबावांच्या आज्ञेनें त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव आपणास सामोरे येत आहेत.

**जय०**—(तो ब्रह्मवृंद आपल्या डेऱ्याचे जवळ आलासें पाहून आपण डेऱ्याचे बाहेर येऊन) मी जयद्रथ प्रणाम करितों. ( लवून नमस्कार करितो. )

**जना०**—राजा, ईश्वर तुला चिरकाल सुखी ठेवो. राजा गुरुजींनीं तुला अशीर्वाद सांगितला आहे. गुरुजीबावांनीं आपणांस उतरण्याकरितां मोतीबागेंत जागा दाखविण्यास सांगितलें आहे ती दाखवितों. तिकडे चलावें.

**जय**—हेंही स्थळ कांहीं गैरसोईचें नाहीं. रमणीय आहे.

**जना**—मोतीबागेचीही जागा रमणीय आहे, व तेथून मंदीरही जवळच असल्यामुळें गुरुजींनीं तेथें योजना केलेली मी

आपणास कळविली. आतां तुम्ही पडलां राजे आणि आह्मी ब्राह्मण, तेव्हां तुमच्या इच्छेप्रमाणेंच सर्व तजवीज रहावयाची. तुह्माला काय इतरांची पर्वा.

**जय०**—आपण आह्मां क्षत्रियांचे गुरू, आपली आज्ञा आह्मास उल्लंघितां कामा नये. जेथें आपण योजना केली तेथेंच उतरणें मला इष्ट आहे.

**जना०**—चलावें तर, असेच माझ्या मागून या. हूं, हा येथून मोतीबाग. आणि उत्तरेकडच्या अंगास कळस दिसत आहे तेंच गजाननाचें मंदीर. आतां आपण मोतीबागेंत येऊन उतरलां असें मी गुरुजीस कळवितों.

**जय०**—बरें आहे. पण त्या अग्निहोत्रीबावांचे दर्शन केव्हां होईल बरें.

**जना०**—मी, गुरुजीबावा मंदिरांत आले म्हणजे त्यांचे कानावर घालतों, आणि आज्ञा होईल त्याप्रमाणें आपणास कळवीन ( असें बोलून सर्वांसह निघून जातो. )

**जय०**—मंदिरचा रस्ता व मंदीर पाहून ये म्हणून तुला सांगितलें होतें, तिकडे तूं अद्याप गेला नाहींस कारे पांचालका?

**पांचालक**—आपल्या आज्ञेप्रमाणें जाऊन आलों. मंदीर व भोंवतालची बाग मी पाहून आलों त्याची हकीकत.

### कटाव.

राजेंद्रा त्या उद्यानाची अद्भुत कीं शोभा दिसती ॥ ध्रु० ॥
झाला सुंदर प्रातःकाळ, वारा वाहतसे झुळझुळ, मंद सुगंध आ-

णि सीतळ, त्याचा होतो ख मंजूळ ॥ चाल ॥ खरजुरिवन तें असें भोंवतीं ॥ मध्यें मध्यें बहु पद्धत पंगती ॥ पूर्वदिशेला संगमरवरी ॥ सफेत काळे आणि केसरी ॥ लाल नीळे तसे शेंदरी ॥ प्रस्तर दुस्तर जोडियले ते बहू कूसरी चौक साधिले तऱ्हे तऱ्हेचे कमलाकृतिचे ॥ कळसपाकी ॥ मधी खारकी ॥ तसेच असती बहुत बदामी ॥ जागोजागीं बूट खोदिले ॥ दोहो बाजुंनीं वेल चढविले ॥ नानापरींचे ॥ सुरम्य साचे ॥ पल्लव मृदुसे ॥ जातिकुसुमचे ॥ गजलय ती वाट रुंदिची ॥ प्रशस्त साची ॥ दोहो बाजुंनीं समांतरानें ॥ गोपूराकृति उंच कठाडे ॥ बहुत गाढे ॥ सवेंच त्यांच्या बहुत मनोहर ॥ स्तंभावरतीं ॥ दीप शोभती ॥ स्वागत वदती ॥ निकट खरे ॥ तरि सूक्ष्म अंतरें ॥ वृक्ष सुरूचे ॥ वरती मंडप घोस द्राक्षांचे ॥ घनदाट असती ॥ राजेंद्र त्या उद्यानाची ॥ अद्भुत कीं शोभा दिसती ॥१॥ दक्षिण दिशेस सुरम्य साधी ॥ संगमरवरी ॥ परि गंडेरी पद पद्धति ॥ शोभतसे मधि ॥ दोहो बाजुंनीं ॥ फुलझाडांचे ॥ वाफे सुंदर शोभति साचे ॥ पुष्पभारें लदबद होती ॥ नानापरींचे सुगंध सुटती ॥ चाल ॥ नंदनवनिंचे ॥ गुलाब खासे ॥ तऱ्हेतऱ्हेचे ॥ कांटि शेवंती ॥ दवण शेवंती ॥ मधुमालती ॥ जुई मोगरी ॥ तगर दुहेरी ॥ घमघमित मोतिया ॥ तसा बेलिया ॥ सफेत पिवळा ॥ चंपक ढवळा ॥ शुभ्र कण्हेरी ॥ लाल केसरी॥ गुलछबू गुलटोप ॥ नेवाळी ॥ सोनकर्दळी ॥ कुंदमंदार पारिजात सुरंगी ॥ नागचाफा सुवर्णचंपक ॥ अशोक तरुवर ॥ बकुल

मनोहर ॥ गुलनार ॥ गुलवास गुलाली ॥ बहुत मखमली ॥ सोनटका ॥ भूचंपक केतकी ॥ ऐशापरीचे पुष्पद्रुम फुलले ॥ नानापरीचे परिमळ सुटले ॥ पुष्पांचे बहु पराग गळाले ॥ कितिएकांचे कळे उमलले ॥ षट्पद जाऊनि त्यांवर बसले ॥ ते मधुलोभें नच उठती ॥ राजेंद्रा त्या उद्यानाची० ॥ २ ॥ पश्चिमदिशेची अपूर्व घाटी ॥ वनवृक्षांची बहुत दाटी ॥ वेष्टियली ती प्लवग मर्कटीं ॥ तोंडें करिती बहू हिंपुटीं ॥ चाल ॥ सुरुंग लाउनि खडक फोडिले ॥ सुगम बहूतचि सोपान केले ॥ गिरि शिखराच्या समीप नेले ॥ मेघमंडळा दिसति ठेपले ॥ दोहो बाजुनीं सुरम्य हिरवे ॥ बिल्वद्रुम ते शोभति बरवे ॥ पत्रें ज्यांचीं बारिक कोमळ ॥ मोठीं बारिक सगळीं नीतळ ॥ बहु कोमलहीं सुरम्य सोज्वळ ॥ फळें पीवळीं सुरेख वर्तुळ ॥ शेजें त्यांच्या चंदन तरुते ॥ बिल्व ताटव्या बहूत वर्ते ॥ कृष्णागरु बहु जुनाट ॥ जिकडे तिकडे बहु घमघमाट ॥ मूळीं ज्यांच्या भुजंग वसती ॥ फणा करूनी कित्येक डुलती ॥ किति फोंफवती इतर जिवांची तेथ न वस्ती ॥ संनिध त्यांच्या देवदारु ते ॥ गगनीं ज्यांचे भिडले माथे ॥ तळीं तयाच्या जाळ्या असती ॥ केसरि त्यांमाधि सदैव वसती ॥ प्राणी तेथें दुजे न वसती ॥ जागोजागीं सुंदर निर्झर ॥ उदक तयांचें बहूत रुचकर ॥ बहूत शीतळ ॥ वाहे झुळझुळ ॥ तीरीं त्यांच्या धेनू चरती ॥ सुखें विचरती नूतन गोऱ्हे ॥ बहू मेंढरें ॥ अनेक जाती ॥ अनेक हरणें ॥ तशिच सांवरें ॥ अर्क ताप त्या नसेच जेथें ॥ वैरभावा ठाव न

तेथें ॥ हरी करीचे मिळोन येती ॥ शावक प्रेमें पान करीती ॥ एके रानीं विहार करती ॥ जिवा शिवाच्या प्रेमें वागती ॥ गरीब होती ॥ श्वान पिल्यांहुनि ॥ मानेवरती मान टाकुनी ॥ निर्भय निद्रा घेती ॥ राजेंद्रा त्या उद्यानाची अद्भुत० ॥ ३ ॥ उत्तर दिशेची विचित्र शोभा लाजवितसे पद पद्धति नभा ॥ जिकडे तिकडे अमीत रंभा ॥ फलभारें ज्यां वहूत शोभा ॥ नानापरिचीं, तीं फळ झाडें ॥ फळलीं सुंदर चोंहीकडे ॥ फळभारें जीं बहूत लवलीं ॥ कित्येक दिसती पाडा आलीं ॥ चाल ॥ गोमंतकिचे कलमी आंबे ॥ मस्कतचीं ती बहु डाळिंबें ॥ सुंदर पिवळीं तशि नारिंगें ॥ सर्वेंच त्यांच्या साखर लिंबें ॥ नाग पट्टणी सुंदर संत्रें ॥ तसेच नंदनपूरि चकोत्तें ॥ दीर्घ वर्तुळी मातुलिंग शोभती ॥ पपनशिच्याही अनेक जाती ॥ ईंड जंबेरी ॥ रोहिल खंडी अनेक अंजिरी ॥ रामफळी सिताफळी नारळी ॥ बहुत पोफळी ॥ सोनकर्दळी ॥ जांब निंबचे ॥ फणस कोंकणचे ॥ नीब सैतूत अनानस ॥ परोपरीचे मधुर फळांची ॥ हंसबलाका शूक सारिका ॥ रुची घेउनी तोष दाउनी ॥ विहार निमित्तें ॥ उडों पहाती ॥ अर्भक त्यांचे किलबिल करती ॥ क्रोष्ट्रा संनिध पाय घेउनी ॥ स्कंधाग्रींच्या कोठीं बैसुनि ॥ तिमीरनाशक ॥ सीतनिवारक ॥ रवि उदयाचि प्रतीक्षा करती ॥ राजेंद्रा त्या उद्यानाची अद्भुत कीं शोभा दिसती ॥ ४ ॥

महाराज, आणखी दुसरी मौज—

श्लोक.

कारंजीं सुटती तुषार उडती बदकें बहू पोहती ॥
हौदा माजि सुरम्य पुष्करलता पुष्पीं तशा दीसती ॥
बैसोनी वरती मधूकरतती गुंजारवातें करी ॥
केकी नाचति ते मराळततिही केली जळीं त्या करी ॥ १ ॥

जो आपणाला काल कळस दिसत होता, तें मंदीर फारच कुशल कारागिरांनीं बांधलेलें आहे. त्याचा सभामंडप मोठा विस्तीर्ण व नकशीदार सुरेख आहे.

आर्या.

त्याच्या तीन्ही बाजुस वेदाचा घोष पाठशाळेंत ॥
होतो तो ऐकाया येती बहु सुज्ञ सुज्ञ ते ख्यात ॥
उत्तर दिशेस निर्मळ आहे आगार तेंच होमाचें ॥
कुंडें तीन मधें त्या भवतें संभार होमपात्रांचे ॥ २ ॥

**रामशास्त्री**—हे राजा जयद्रथा, गुरुजीबावानीं मीनाक्षी ताईसह आपण देवदर्शनास यावें, ही आर्तीची वेळ आहे. विलंब करूं नका, म्हणून आपल्यास सूचना करण्यास मला पाठविलें आहे.

**जयद्रथ**—पांचालका देवदर्शनास जाण्याकरितां निघण्याची तयारी लौकर कर.

**पांचालक**—आज्ञा सरकार. ( निघून जातो ) सर्व त्याचे मागून निघून जातात.

---

# प्रवेश २ रा.

## स्थळ—सुंदरवन गणपतीमंदिर.

**विश्वंभर**—कोण आहेरे तो, जनार्दन अद्याप दूर्वा फुलें घेऊन नाहीं कारे आला.

**रामशास्त्री**—महाराज आज प्रातःकाळींच आह्मी मीनाक्षीताईस सुमुहूर्तावर घरीं आणण्यासाठीं गेलों होतों. पण आह्मी बागेंत पोंचलों तेव्हां मीनाक्षीताई उठल्या नवत्या, म्हणून जनार्दनशास्त्री, बाई उठल्या म्हणजे त्यांस घेऊन येण्याकरितां, तेथें थांबले, आरतीचे वेळेपावेतों मी ताईस घेऊन येतों म्हणून ते बोलले. आह्मी दूर्वा फुलें घेऊन आलों, आणि नित्याप्रमाणें तीं जेथल्या तेथें ठेविलीं आहेत. शास्त्रीबावाही आले वाटते.

**मीनाक्षी**—( मोठ्या आनंदानें सभामंडपांत प्रवेश करून चोहींकडे पहात पहात मेघडंबरीपावेतों जाऊन दारांतून देवदर्शन घेऊन ) बाबा मी नमस्कार करितें. असे मीनाक्षीच्या तोंडचे शब्द कानीं पडतांच आनंदानें.

**विश्वंभर**— आर्या.

श्री गजवदन कृपेनें पति तूं जगिं पावशील कुळवंत ॥
बहुकाळ वांचुनी गे उभय कुलां देशि सौख्य अत्यंत ॥३॥

( असा आशीर्वाद देतांना मीनाक्षीस पाहून पितृवात्सल्यानें कंठ सद्गदित होऊन आनंदाश्रूंच्या धारा नेत्रांतून वाहताहेत

आणि म्हणतो ) वत्से या माझ्या वार्धक्यांत त्या दुष्टांनीं तुला धरून नेलें. तेव्हां तूं पुन्हां माझ्या घरीं येऊन मला भेटशील अशी आशा नव्हती. पण श्री गजाननानें भेटविलें, येणेंकरून मी कृतार्थ झालों असें वाटतें. बरें तूं आतां घरांत जा आणि भेट साऱ्यांना.

**जयद्रथ**—हे गुरुवर्य, मी चरणाप्रत वंदन करितों. महाराज, कुरुपतीनें आपल्या सेवेशीं सादर असल्याचें प्रदर्शक पत्र दिलें आहे. ( थैली पुढें ठेवून प्रणाम करितो. )

**विश्वंभर**—कोण आहेरे, जनार्दन?

**रामशास्त्री**—महाराज जनार्दनशास्त्री आज प्रातःकाळीं मीनाक्षीताईस आणावयास गेले होते त्या कारणानें त्यांचें कांहीं आन्हिक राहिलें होतें, तें उरकण्यास ते गेले आहेत.

**विश्वंभर**—बरें, तोच पाहिजे असें नाहीं. हें त्या राजाकडून पत्र आलें आहे, हा लखोटा फोड आणि आंतील पत्र वाच. ऐकूं दे काय लिहिलें आहे तें.

**राम०**—आज्ञा महाराज.

## आर्या.

वंदुनि श्री गजवदना प्रार्थितसें मी तुह्मां बुधां सदया ॥
अवधान देउनीहो स्वीकारा विनति हीच करुनि दया ॥४॥

**विश्वंभर**—काय? कुरुपती मला ब्राह्मणाला इतक्या नम्रतेनें लिहितो.

**जयद्रथ**—कुरुपतीहून श्रेष्ठ देखील ब्राह्मणांचे चरणीं लीन

असलेले ऐकिलें आहे. मग कौरवेश्वर नमीत आहे ह्यांत नवल कोणतें ? आह्मां क्षत्रियांस हें भूषणच होय.

**विश्वंभर**—हं हं. बरें. खरोखर तुमची ब्राह्मणावर अशी भक्ति असली तर ईश्वर तुह्मांस सदैव यशच देईल यांत संशय नाहीं. अस्तु. पुढें वाचरे.

## आर्या.

माझ्या दुःखा कारण झालों मी हेटळोन भूदेव ॥
व्हा आश्रय तुह्मि मातें विप्रसुता जेवि तो महादेव ॥ ५ ॥

**विश्वंभर**—बरें, वाच पुढें.

मीनाक्षी मागाया आलां तैं म्यां बहू अजाणानें ॥
कटुवचनें छळ केला तो पोटीं घालिजे सुजाणानें ॥ ६ ॥

**विश्वंभर**—अरे तो सार्वभौम, मी यकःश्चित् ब्राह्मण आणि मला त्यानें इतका मोठेपणा द्यावा हें नवल नव्हे का ! दुर्योधनासारखा मानी राजपुरुष, आणि त्यानें मला ब्राह्मणाला असें नम्रतेनें लिहिणें ह्मणजे मुसळाला अंकुर फुटण्याप्रमाणें भासतें, मग हें कसें झालें असेल तें देव जाणे.

**जय०**—महाराज आह्मी कितीही मानी असलों तरी ब्राह्मणाचे प्रभावापुढें आमचें कांहीं चालत नाहीं असें वडील सांगत तें खोटें नव्हे. अशी खात्री झाली म्हणूनच असें कुरुपतीनें लिहिलें आहे. आतां आपण आह्मावर कृपाच केली पाहिजे.

**विश्वंभर**—हूं पुढें वाच रामा पाहूं.

जो घडला दोष न तो क्षम्यपरी मागतों क्षमा पावा ॥
रक्षा मज्जन जीवित उत्साहें प्रार्थुनीच त्या देवा ॥ ७ ॥

**श्लोक.**

दूर्वा सिंदूर अर्पुनी गजमुखा प्रार्था तुम्ही सन्मनें ॥
आहे तोच तुम्हां जगीं वश तसा नाहीं तुज्या कारणें ॥
देवोनी बलिही करूनि हवनें देवास त्या आंवरा ॥
वाराया सकलाहि व्याधि अमुच्या इच्छीत कार्यें करा॥८॥

**विश्वंभर**—बरें जयद्रथा आतां माध्यान्हकाळचा समय होत आला, आतां माझीं ब्रह्मयज्ञादि कर्में करण्याचीं राहिलीं आहेत तीं उरकण्यास मी जातों. तूंही आपल्या डेऱ्यावर जा. श्रीगजानन इच्छेनुरूप जें काय होणें असेल तें यथावकाशें होईल. आणि मग तुला परवानगी मिळेल.

**जयद्रथ**—जशी गुरुवर्यांची आज्ञा होईल तदनुरूप ह्या सेवकाकडून वर्तन होईल. ( सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ३ रा.



### स्थळ—विश्वंभराचा वाडा.

**मीनाक्षी**—( वाड्यांत प्रवेश करून ) आई मी नमस्कार करित्यें.

**अन्नपूर्णा**—(मुलीस पाहून आनंदभरित होत्साती) मुली.

श्लोक.

गजाननें भेटविलें तुलागे, असोचि आरोग्य सदां तुलागे ॥
तसाच आतां गणराज पावो, गुणानुरूपा वर, तूज देवो ॥९॥
धाल्यें, ऐकुन, गे, मनोहर तुझें आहे सदां बोलणें ॥
रक्षूं, देव, तुला, गजाननाचि तो योजूं पतीकारणें ॥
कैसा कोण मिळेल तूज वर ही आम्हा सदां घोंकणी ॥
नाहीं ठाउक तो परेश कधि, ही, तोडील, गे, कांचणी॥१०॥

**मीनाक्षी**—आई असेंग कसें तूं आतां बोलत्येस.

**अन्न०**—अग कसें म्हणून काय विचारतेस. आतां अजून देखील का तुझें लग्न करायला नको ? तुला आतां समजूं लागलें चांगलें, आतां यापुढें तुला तसें ठेवतां कामा नये; बरें, तूं आतां दमली भागली आहेस. माडीवर जा, अन चार घटका हायशी झोंप घे. ॲ. हें काय पण. इतक्या लौकर कसें तें आज घरीं यायला झालें !

**विश्वंभर**—( हातांतील झारी खालीं ठेवून दर्भासन नियमित स्थळीं ठेवतांना ) कांग यमुने आज अशी ( वाईट तोंड करून कां बसलीस बरें, तुझी ताई आलीना आज, रोजच्याप्रमाणें तुजबरोबर बाहुल्यांनीं खेळायला ?

**यमुना**—बाबा, मी कनिहो, ताईबराबर भावल्यानीं खेळायला माडीवर गेलें. पण ती कनिहो बोलली देखील नाहीं बरका. अन कनिहो फुरगुटून बसली आपणच, अन कनिहो दोन कुणबिणी देखील तिच्याच बरोबर आंत गे-

ल्या. त्या मला शिवूं लागल्या तशी मी आपली पटदिशीं पळू-
न येऊन दारांत बसलें.

**विश्वंभर०**—बरें बरें मी आतां तिला रागें भरेन म्हणजे
झालें ना.

**यमु०**—नाई नाई पण थांबा. आणिकनिहो ताई एका
कुणबिणीस म्हणाली माझें मंगळसूत्र दे ओंवून लौकर. त्याच्या
शिवाय मला पाणी देखील प्यायचें नाहीं. अनिक कनिहो ति-
न मला ढकलून दिलन तशी बसलें मी आपली येऊन

**विश्वंभर०**—( तिच्या गळ्यास हात लावून ) हें काय
आहे सांग बरें ?

**यमु०**—काय म्हणजे. ही माझी दूड.

**विश्वंभर०**—तशी तुझ्या ताईच्या गळ्यांतली दूड तुटली
असेल ती सांगितली असेल तिनें ओंवायला. आतां तिचें लग्न
झालें म्हणजे तिचा नवरा ( मुलीचे गळ्यास हात लावून )
असें काळ्या गळेसराचें तिच्या गळ्यांत बांधील त्याला मंगळ-
सूत्र म्हणावें.

**यमु०**—मग कशी होती म्हणाली मंगळसूत्र ओंव म्हणून.

**विश्वंभर०**—तूं लहान आहेस, तुला कळत नाहीं. बरें तूं
जा आतां घरांत, मला मंदिरांत आतां नैवेद्य घेऊन जाऊं दे.

( निघून जातात. )

---

## प्रवेश ४ था.



### स्थळ—मीनाक्षीचा महाल ( खोली ).

**मीनाक्षी**—कांग, तरलिके ? मामाजींनीं माझी इकडे रवानगी केल्यापासून मी पुष्कळ पुष्कळ आठवण करून पहात्यें आहें कीं.—

**श्लोक.**

क्षोभून नाथें मज धाडिलें कां ॥ झाला असा दोषचि काय, शंका॥
शोधून पाहें अपुल्या मनीं गे॥मातें न त्याचा तरि थांग लागे॥ ११॥

**आर्या.**

कळला असेल तुम्हां तरि सांगागे नका धरूं भीती ॥
होतें दुःख मला बहु विरहें वाटेच प्राण हे जाती ॥ १२ ॥

**तरलिका**—नाहीं बाईसाहेब, आम्हाला नाहीं ठाऊक; पण बाईसाहेब, आपल्या कडून चुकी होण्याला अवकाश तरी केव्हां सांपडला! नुकतें परवांचे दिवशीं रात्रीं महाराजांनीं, आपल्याशीं विनोदाची तर, सीमाच केली. आपल्याला झोंप कशी ती सरकारांनीं लागूं दिलीच नाहीं. हें तर खरें ना ? आणि ज्या दिवशीं इकडे आपल्यास रवाना केलें त्याच दिवशीं सरकार रोजच्यापेक्षां थोडेसें लवकर उठल्यामुळें आपण त्यांचा पदर धरून ठेवलात, आणि मग चार घटका दिवस चढेपावतर कसकशा गमती होत होत्या बरें ! तेथून सरकार उठून दरबा-

रास गेले आणि दरबारांतून येण्याच्या अगोदर मामाजींनीं आपली इकडे रवानगी केली. दरबारास गेल्यापासून निघण्याचे वेळेपावेतों चुकी होण्याला मध्यें आपली आणि सरकारची नजरानजर तरी झाली का? आपल्याकडून सेवेंत अंतर पडण्याला? मग चुकलें, दोष घडला, हे आपल्या मनांत तरी कसें आलें कोण जाणें! आपण तसें म्हटल्यापासून आह्मास तर चटकाच बसला. म्हणून एकेक प्रकारची आठवण कर करून पहातों आहों पण मला कुठेंच कांहीं आठवत नाहीं, तुला आठवतें काग प्रियंवदे कांहीं. छेग झालंच नाहीं कांहीं मग कसं बाई आठवावं तरी!

**मीना०**—तर मग.

## श्लोक.

जागे कोणि तरीं पुसा नृपसुता, कां, त्यागिलें, ते, मला ॥
झालें, काय, महान, तें, अघ, असे, कीं, ठाउकें, बा, तुला ॥
जागे तूं, सखये, गडे, तरलिके, घेउन ये लौकरी ॥
वार्ता काय असे मला अति त्वरें ती धाडण्याची खरी ॥ १३ ॥

(प्रियंवदे, कांग तर मजवर येवढें रागवायचं बरं! मला कनई, निघाल्यापासून अन्नकापाणी सुचत नाहीं कस तें; अष्टोप्रहर ते पाय दिसताहेत डोळ्यापुढें. त्या दिसच्या रात्रीचा एकेक शब्द आठवला म्हणजे कसंसंच होतं. (शाहारा देऊन तोंड वाईट करते.)

प्रियंवदा— श्लोक.

नाथाला अपुल्यामुळें किति तरीं सांगू गमे सूख ते ॥
जातां एक निमीष दूरच तुम्ही त्यां दुःख साहे नतें ॥
घेती पान करावयास पय जैं पात्रींच प्रेमें करीं ॥
कैसा प्रेम ! मुखीच घोटत कसे ह्या ह्या वरीचे वरी ॥ १४ ॥

अशा प्रकारची प्रीती असतां सरकारांनीं एवढा दुर्धर वियोग कसा सहन केला ! आणि आपणास ह्या वियोगरूप दुःखसागरांत लोटण्यास त्यांना कशी बुद्धि झाली ! तें देव जाणे. आपली उभयतांची जशी प्रीति आमच्या पहाण्यांत आली अशी मागें अमक्या एकाची होती असें कोणाच्या तोंडचें ऐकलें नाहीं व ह्या आपल्या जोड्याशिवाय ऐकूं असं देखील वाटत नाहीं बाईसाहेब !

मीनाक्षी—कशीग मेली तूं आहेस तरी—

श्लोक.

नकोगे नको आठवूं शब्द तेगे ॥ मला गांजिती फार ते गे वियोगें॥
नसे दोष कांहीं तरी क्रोध कांहा असे त्यागितीं स्वामि मातें अहाहा १५

( असा खेद करीत मूर्छित पडते. )

प्रियं०—बाईसाहेब सावध व्हा, सावध व्हा, अशा अधीर होऊं नका तरलिका आतां येईल. आणि ह्या दुःखकारक प्रसंगाचें बीज खचित आपणास समजेल. आपण सावध व्हा.
( तिच्या डोळ्यांस पाणी लावून वारा घालते. )

मीनाक्षी—( निश्वास टाकून ) अग मजकडून अमर्यादा

झालीच नाहीं अशा प्रकारें तुम्ही माझी समजूत करतां पण विनाकारण कोणी, कोणास दुःख दिलेलें, किंवा सोसलेलें, कधीं कोणी ऐकलें तरी असेल कां ! इतकें तुम्हाला कळत असतां तुम्ही मला बोलतां हें मला उमजतें. बरें तरलिका कांग अझून येत नाहीं ! मेली गेली तिकडेच बसली.

**प्रियं०**—होय बाईसाहेब, खरेंच तिला जाऊन फार वेळ झाला. ती परतली कीं नाहीं अझून; हें मी गच्चीवरून तरी पहातें ( जिना चढून खिडकींतून डोकावून ) आली हो आली. मेली रेंगांळतच चालते आहे. आली एकदांची !

**मीना०**—कांग इतका उशीर कां लागला. पण तें सगळें मग विचारीन. बातमी काय काढून आणलीस ती सांग अगोदर.

**तरलिका**—काय सांगू बाईसाहेब ( दोन्ही हात चाळ्यांवर लावून निश्वास टाकून ) जी कधीं कोणी ऐकिली देखील नसेल अशी नवलाची गोष्ट घडली ही ! आपले वडीलच आपल्यास ह्या दुःखार्णवांत पाडण्यास कारण झाले म्हणायचं नि काय !

**मीनाक्षी०**—( कपाळास हात लावून ) जे जे नशिबीं लिहिलें असेल तें का टळायचं ( दुःखानें निश्वास टाकून ) बरं सांग काय जयद्रथानें सांगितलं तें ऐकूं दे.

**तरलिका**—ते म्हणाले आपलें लग्न झाल्यावर लौकरच आपले वडील आपणास न्यायला आले होते. पण आपल्याशी सरकारची प्रीती फार जडली होती म्हणून. आपल्या वडिलांचे म्हणणें राजास आवडलें नाहीं. राजानें अनेक प्रकारें त्यास

समजावण्याचा यत्न केला; राजा जसजशी समजूत घालूं लागला तसतसे आपले वडील अधिकच संतापत चालले. आणि आपणास घेऊन जाण्याची आशाच नाहींशी झाली तेव्हां माझा तूं अपमान करित आहेस याचा चमत्कार तुला लवकरच दिसेल असें बोलून गेल्यावर, लौकरच.

श्लोक.

रणकदन न होतां वीरसंहार झाला ॥
असुख बहुत झालें देखुनी ते नृपाला ॥
कथिति निपुण जोशी धाडि मीनाक्षि बाला ॥
क्षणमपिच उपेक्षा भूप जीवास घाला ॥ १६ ॥

**मीनाक्षी**—हा ताता ! हारे दैवा ! कोठें लपलेंस पुन्हां ! ! !
( असा खेद करतां करतां मूर्छित पडते. )

**प्रियंवदा**—( बाह्य उपचारानें तिला सावध करून ) बाईसाहेब या वेळीं माझी मनदेवता असें सांगते कीं, थोडक्याच काळानंतर आपणास पूर्ववत् सुखाचा दिवस लौकरच प्राप्त होईल.

**मीनाक्षी**— पद.

आहारे ! धात्या ! दुष्टरे तूं दिसशी ॥ ताताच्या द्वारें अबलेला नाडीशी ॥ ध्रु० ॥ द्विजकूलीं जन्मा कासया घातलें ॥ अनुपम्य रूप कां मातें दीलें ॥ देवोनी सुगुण पितरां कां मोहीलें ॥ बाळपणी मजला काळा का न दिलें ॥ आहारे धा० ॥ १ ॥ सातवें वर्ष लागतां तें माला ॥ अयोध्येचा भूप मागूं

मातें आला ॥ तात त्यां बोले आहे ही द्विज बाला ॥ क्षत्रीया देतां दोष लागे कूळा ॥ आहारे धात्या० ॥ २ ॥ धुंडीतां स्थळें वर्षें सात गेलीं ॥ लग्नाची घटका जमुनी नाहीं आली ॥ वडिल तीं सारीं चिंतातूर झालीं ॥ तोडीती मीठ म्हणती थोर झाली ॥ आहारे धा० ॥ ३ ॥ रूप हें माझें नाणवलें देशांत ॥ कुरुपतिचें सैन्य आलें कीं धांवत ॥ नागरिक म्हणती हिमुळें हा घात ॥ नेवोनी हिजला रक्षू आह्मा नाथ ॥ आहारे धात्या दुष्टरे तूं दिसशी ॥ ताताच्या हातें अबलेला नाडीशी ॥ ४ ॥

ब्रह्मदेवा ! लग्नाच्या अगोदर दुःखकारक जे प्रकार झाले ते झालेच. पण लग्न होऊन जनचालीप्रमाणें एकदांची संसारसुखांत पडलें हें तुला खपलें नाहीं ! ! ! आतां तूंच जर आह्मा अबलांचीं अशी पाठ पुरवूं लागलास तर आमचा काय पाड तुझ्या पुढें ! तूं आतां माझा दीनेचा छळ करूं नको ! तुला नाक घासून पदर पसरून मी विनंती करिते एवढी ऐक. जावत्काल माझें आयुष्य आहे तावत्काल आमची ताडातोड करू नको. ( असा विलाप करीत असतां धाकटी बहीण दार ढकलून, आंत येऊन, गळ्यास मिठी मारून, कोमल, मंजूळ व मधुर स्वरानें गोड गोड बोलून, तिचे डोळे पुसून, तिला गुदगुल्या करून, बोलविण्याचा यत्न आपल्या लेंकर स्वभावाप्रमाणें तिनें केला. पण व्यर्थ. मीनाक्षीला देहभानच नाहींसे पहातांच घाबऱ्या घाबऱ्या ती मुलगी हिरमुसली होऊन परत जाते. )

**तरलिका**—बाईसाहेब, दोघी तिघी बाया आल्या आहेत त्यांच्या बरोबर एक दासी आहे तिनें ही चिठ्ठी दिली आहे.

**मीना०**—( चिठ्ठी पहातांच ) राधा ! हँ हँ मनोहर दिक्षितांची. बरें, जा दिवाणखान्याचें दार उघडून त्यांना वर आणून बशीव तों मी येतें. ( निघून जातात. )

---

## प्रवेश ५ वा.



### स्थळ—विश्वंभराचा दिवाणखाना.

( राधा, सरस्वती, भागीरथी, ह्या झोंपाळ्यावर बसल्या आहेत आणि मीनाक्षी माझघरांतून वर येण्याच्या जिन्यानें दिवाणखान्यांत येतांच )—

**राधा**—मीनाक्षी, येगबाई तुला भेटूं दे. तुला त्या पेंढाऱ्यांनीं धरून नेलें त्या वेळच्या पाहिलेल्या प्रकारावरून तूं पुन्हा आमच्या दृष्टीस पडशील असें स्वप्नांत देखील येण्याचा संभव नव्हता. असा तो भयंकर प्रसंग ! ! !

**सरस्वती**—( मीनाक्षीस आलिंगन देऊन ) बाई आह्मीं नशिबाच्या पुऱ्या; म्हणूनच तूं पुन्हा आमच्या नजरेस पडलीस बर का ? त्या मेल्यांच्या हातून तूं वांचशीलसें देखील वाटत नव्हतें.

**भागीरथी**—गडे तूं आलीससें ऐकल्याबरोबर, माझी वडील बहीण जशी कांहीं जिवंत होऊनच मला भेटायला आलीसें वाटून मी इकडे आलें. सासुबाईना पुसण्याचें देखील मला भान राहिलें नाहीं.

( याप्रमाणें भेटी होऊन एका भव्य पर्यंकावर साऱ्याजणी बसल्या. ) मीनाक्षीकडे व तिच्या वैभवाकडे सलक्ष पाहून मैत्रिणी पैकीं—

**राधा**— आर्या.

दुःखच वाटत होतें तुज पहातांगे तसें नसे आतां ॥
वूढा पाहुनि अमूची गेली आतां समग्र सखि चिंता ॥ १७ ॥

पण— श्लोक.

तुला नेलें दूतीं स्थिति मग तुझी गे सखि कशी! ॥
वदे साद्यंता ती नृप तुजवरी गे कशि अशी ॥
सुता तूं विप्राची सुशिल सुगुणी तापसि तशी ॥
आह्मा वाटे कामें तुज मथुनि केली स्थिति अशी ॥ १८ ॥

आतां जशी आह्माला शंका आली आहे, अशी घेण्याचें वास्तवीक पाहिलें तर कारण नव्हतें. कां म्हणशील तर देवाचे दयेनें तुझें सौंदर्य तूं अशा स्थळीं पडण्याजोगेंच आहे. तथापि लहानपणापासून तुझ्या वृत्तीचा कल तापसपणाकडे फार. तूं आपल्या पणांत आलेली खरी तरी कुसुमचापाचे फाशांत एकाएकी सांपडणारी नव्हेस अशी मनोनिग्रही. तशांत तुझ्या वडिलाचा निग्रह कीं शाप असो किंवा दुसरें कांहींही गंडांतर अ-

सलें तरी मी मीनाक्षीला ब्राह्मणाच्याच घरीं देईन. इतकेंही असतां तुझा क्षत्रियाशीं विवाह झाल्याचें दिसतें. ह्यावरून तुझ्या लग्नाचा प्रकार लोकोत्तर असलाच पाहिजे. आणि तो अद्वितीय प्रकार ऐकून कर्ण चकोर तृप्त व्हावें असा मानस आहे.

**मीनाक्षी**—बाई तें कसें झालें अन् काय झालें तें पुसूंच नका! हाय! ( शहारे देते ) नकोग बाई त्या गोष्टीचं नांव!

**राधा**—आपल्या बोलण्याचे रोंखावरून ती गोष्ट दुसऱ्या कानास कळण्या ( षट्कर्णी होण्या ) जोगीं नाहीं असें दिसतें. मग आह्मीही सांगाच म्हणून आग्रह धरणें हेंही बरें नव्हे. येते तर आतां. थोरांच्या बायकांना कंटाळा येईपावेतों बसवून भाकडकथा आह्मी भटाभिक्षुकांच्या लेकी-सुनांनीं पुसणें हें खरंच चांगलं नव्हे.

**मीना॰**—नकोग बाई त्या गोष्टीचं नांव असं मी म्हटल्यावरून तुझ्या मनाला, मला ऐश्वर्यानें गर्व होऊन मीं तसें बोललेंसें वाटलें, अन् तूं टोमणा दिलास मी समजलें. पण तसें कांहींच नाहीं बर कां! बसा ऐका मी सारं आठवेल तसं सांगतें.—

श्लोक.

धरूनी मला बांधिलेंगे रथातें ॥<br>
म्हणे मी सख्ये धांवगे धांव मातें ॥<br>
बहू वेदना होति त्या सोसवेना ॥<br>
न सोडी न कोणी मलागे पुसेना ॥ १९ ॥<br>
तृषेनें बहू प्राण व्याकूळ झाले ॥

भुकेनें सख्ये नेत्रही खोल गेले ॥
चढे दीन जैसा तसा घर्म चाले ॥
जिभेनें करी तेधवा ओंठ ओले ॥ २
असें पाहुनी दुष्ट तो सूत मेला ॥
म्हणे सोडितों घालिगे माळ माला ।
असे प्रीय मी सूत त्यागे नृपाचा ॥
तुला सौख्यदाता जगीं मीच साचा
जरी तूं न होशील माझीच कांता ।
तरी प्राण तूझेचि जातील आतां ॥
बरें कोणतें सांगगे वाटतें तें ॥
तुला पाहतां पीडितो काम मातें ॥
नसे त्राण मातें फुकाचें रडाया ॥
दिली बुद्धि ईशें तयातें भजाया ॥
मनी मी उमेतें म्हणे धांव माते ॥
नको अंत पाहूं आतां रक्षि माते ॥
जरी घातल्या अंगुली मी स्वकानीं
तरी दुष्ट तो सोडिना दुष्ट वाणी ॥
म्हणोनी पुन्हा प्रार्थिलें अंबिकेतें ॥
तिणें वाटतें धाडिलेंगे पतीतें ॥ २४

**राधा**—पहिलें तूं जें सांगितलेंस तें थोडेसें अ
ल्यांनीं पाहिलें होतें. त्यावर तुझ्या अनुभवलेल्या
लाखणी तुझ्या तोंडून ऐकली. त्यावर तूं मार्ग क्र

त्या गाडी हांकणाराच्या मनांत दुष्टवासना उद्भवून त्यानें तूं त्याची बायको होण्याच्या बुद्धीनें तोंडांतून त्यानें जे शब्द काढले! ( जीभ झडेल त्या गुलामाची ) तो प्रकार ऐकून माझा जीव अगदीं घाबरून गेला बाई!

**सरस्वती**—गडे तो पहिला प्रकार ऐकून माझा जीव तर उडून गेला, पण 'तिणें वाटते धाडिलेंगे पतीते' हें तूं सांगितलेंस तें ऐकून थोडासा धीर आला आणि तुझ्या रक्षणार्थ तुझ्या वडिलाची पुण्याई तुला फळास आली असावीसें वाटतें.

**भागीरथी**—अग तिच्या वडिलाची पुण्याईच का म्हणतां! तिनें मागच्या जन्मीं मनोभावानें गौरीहर पुजला होता. त्यामुळें लहानपणापासून तिला त्या देवाच्या सेवेचा छंद आहेच. त्याच देवानें हिला ह्या संकटांतून सोडविलें असेल नि काय! अशा संकटीं दुसरा कोण वाली उभा राहणार! बरें पुढें सांग ऐकूं दे.

**मीनाक्षी**—मग मी बाई अगदीं भांबावून गेलें, कांहीं सुचेना, दीन वदनानें दाही दिशांना भिरभिर पाहूं लागलें तों अकस्मात् एक बुवा समोरून आला.—

**श्लोक.**

भली लांब दाढी शिरीं केश भारा ॥
करीं शस्त्र त्याच्या तया तीन धारा ॥
दिसे थोर धिप्पाड कीं काळ त्याला ॥
सुताला, मला, भासलें, तात आला ॥ २९ ॥

त्वरें येउनी मारुनी त्या सुतातें ॥
म्हणेगे मुली पाहिजे काय तूतें ॥

**भागीरथी**—होग हो. ठीक झालें! त्या रांडेच्या सुताचें त्या बुवानें कांडात काढिले तें. घे मेल्या मीनाक्षी तुला बायको हवी होती नाहीं का!

बरें सांग बाई मीनाक्षी पुढें कसकसें झालें तें.

तया देखुनीही म्हणे मी अगाई ॥
मना भीति माझ्या न साहेच बाई ॥ २६ ॥

**मीनाक्षी**—मग कनी बाई त्या बुवानें कनीहो.

**श्लोक.**

धरोनी करीं चुंबुनी वक्त्र माझें ॥
धरी पोटिं मातें हरी दुःख ओझें ॥
कडे घेउनी वायु वेगें पळाला ॥
तयीं वाटली भीति हो फार माला ॥ २७ ॥

गेले झांकोनि डोळे प्रखर तर जवें आंगही गार झालें ॥
नेलें कोठें कळेना श्रम जनित शिरीं घर्म बिंदूहि आले ॥
गेला अस्तास भानू जनपद न दिसे यामिनी मध्य झाली ॥
झाली माझी स्थितीहो पुढति मग कशी ठाउकी नाहिं आली॥२८॥

प्रभातीं मी बाई उठुनि जंव पाहें चहुकडे
कुठे कैशी आलें मजचि न कळेगे कुणिकडे ॥
नृपाच्या ऐश्वर्या तसेच स्वरुपा पाहुनि मला ॥
कसें झालें नेणें प्रखर तर हो ताप चढला ॥ २९ ॥

घडघड रथ चाले नेइ मातें वनाशीं ॥
अणिक मज न कोणी ह्या सवे दोन दासी ॥
सुसहपवन वेगें पोंचलो वारुणेशी ॥
पुढति स्थिति कशी ती बोलती ह्या तुम्हाशी ॥३०॥

( दाशींकडे बोट दाखवून )

**सरस्वती**—पण तूंच कां सांगेनास.

**राधा**—अग मीनाक्षीनें पुढच्या गोष्टीचा हवाला दासीवर दिला हें ठीक केलेन. तरलिके सांग पुढें तूं काय काय पाहिलंस तें.

**तरलिका**—बाईसाहेब मग आपला चमत्कारच झाला म्हणायचा.

आर्या.

मोहनिरूपा पाहुनि वेडावे जेवि ईश देवमणी ॥
कुरुपतिलाहो झालें तैसें पहातांच ही सखी रमणी ॥ ३१ ॥
पाहुन मीनाक्षीतें हर्षे नृप दे वृषा करीं टाळी ॥
झाले उपकार जगीं थोर असें वदुनि त्यास कंवटाळी॥३२॥

अन् मग ते दोघेही आमच्या बाईसाहेबांस लक्षून ते आपआपणांत पुरुषाची थट्टेचीं बोलणीं बोलूं लागले तों जसजसे एकमेकांत विनोद करूं लागले ( तसतशी ह्याची अ: मेल भलभलतेच काय मी बडबडतें हें ) तशी मी तेथून बाईसाहेबांबरोबरच निघालें.

**राधा**—अग असं काय तें " ह्याची " इतकेंच बोलून बोलणें फिरवलस कां ? नीट सांग काय तें.

**तरलिका**—नाहीं बाईसाहेब पुढें काय झालें तें आठवत नाहीं.

**भागीरथी**—अग राधे तूं अगदीं भाबडी आहेस तिला मालकिणीनें दटावलें, मग ती कसेग सांगेल.

**सरस्वती**—( मीनाक्षीस उद्देशून ) अहाहा! दबवायला कशाला हवें होतें तें. आपल्या पणांत आल्यावर पुरुषाची थट्टेचीं भाषणें कानीं पडलीं म्हणजे साऱ्यांनाच तसें होतें, पण कोणी कशा निमित्यानें झांकतें, कोणी कशा निमित्तानें लपवतें. तरी मैत्रिणी मैत्रिणी मिळाल्या म्हणजे कांहीं तसं नसतं हो; हँ सांगग तूं तरलिके पुढें काय काय झालं तें.

**तरलिका**—मला आठवतच नाहीं काय तें मग सांगूं तरी काय बाई!

**राधा**—अग आतां चला जाऊं, आपल्याला आल्याला बराच वेळ झाला. पुरे आतां आणखी किती वेळ बाईसाहेबांस बसवायचं तें! कंटाळा नाहीं का येत बर!

**मीनाक्षी**—पुरेग तुझं. मला कांहीं कळत नाहीं वाटतं मनुष्याचा रोंख. ( तरलिकेकडे सस्मित पाहून ) अग तिला आठवलं म्हणजे सांगेल. पण ह्या भागिरथीला आपली साऱ्याच गोष्टीची घाई.

**भागिरथी**—अग घाई नाहीं. पण फारच उशीर लागला तर सासूबाई बोलतील म्हणून भय वाटतं. सांगग तरलिके आतां तरी कांहीं आठवलें असेल तर.

तर०—मग कनी आमच्या बाईसाहेबांचे एकाएकींच हो पण.

**श्लोक.**

नृपा पाहुनी नेत्र आरक्त झाले ॥
स्फुरे वामबाहू तसा ओंठ हाले ॥
न बोले न हालेच हो नेत्रपातें ॥
करा तर्कहो कोणतें दुःख यांतें॥ ३३ ॥
करी हातवारे पडे व्याकुळाही ॥
करें खूण दावीच कीं होति लाही ॥
करूं आह्मि सीतोपचारा न घेई ॥
तशी अंगरागास पाहे न बाई ॥ ३४ ॥
गजबज बहु झाली अन्य दासीहि आल्या ॥
हळुच धरुनि ह्माना मंचकीं स्थीत केल्या ॥
करुं हि विझणवारे आह्मि त्या वेगळाल्या ॥
वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ ३५ ॥
गेलें ताठुनि अंगहो सकल तें संतप्त झालें ज्वरें ॥
आला सोत्सव भूपकामि परितो स्पर्शूं शकेना करें ॥
जारे कोणी म्हणे त्वरें करुनिया घेऊन पंचाक्षरी ॥
योजा औषधि जी त्वरें हरि खरी व्याधी हिची लौकरी३६

मग बाईसाहेब राजाची अशी आज्ञा होतांच राजाचे प्यादे चोंहीकडे धांवले. इतक्यांत—

**श्लोक.**

फिरत फिरत आला एकहो जोगि तेथें ॥

कथिति जन तयातें बाहतो भूप तूतें ॥
अतिथि वदत त्यांशीं भूप कां वांछिताहे ॥
मन जनित सुखा का आमुच्या नाडिताहे ॥ ३७ ॥

पण कसेंबसें करून त्या योग्याला पदरच्या लोकांनीं राजास भेटवितांच—(कांहीं वेळ पावेतों सलक्ष्य त्या योग्याकडे पाहून)

राजा— आर्या.

आर्या भासशि मातें धन्वंतरि मूर्त अश्विनी कुमर ॥
करुनी कृपा दयाब्धें, सुखवीं मीनाक्षि, वारि, तापद्र ३८

यावर—योगी लावि विभूती कर्णीं कामारि मंत्र शिव सांगे ॥
तच्चरणीं मिठि घालुनि प्रार्थि म्हणे दे वरास शिवसा,गे३९

तेव्हां योगी म्हणाला तूं माझी धर्माची कन्या आहेस तुझी आळ पुरविली पाहिजे. श्लोक.

जवरि विधि विधानें लग्न नाहींच झालें ॥
तवरि तुज स्मराचा वेध लागे न बाले ॥
अनय करुनि तू तें भोगुं इच्छी तयाशीं ॥
तयिंच निमिष मात्रें काल दंडील त्याशीं ॥ ४० ॥

याप्रमाणें झाल्यावर तो योगी जाऊ लागलासें पहातांच आमच्या बाईसाहेबांनीं त्यांचे झट्दिशी घट्ट पाय धरले आन बाई त्यांना जें रडें कोसळलें तें त्यांना आंवरेना. तेव्हां त्या बावानें ह्याना पोटाशीं धरून सांगितलें कीं, आतां लौकरच तुझें लग्न होऊन तूं संसारसुखांत पडशील. आणखी तूं सदाचारणानें वागण्याकडे लक्ष ठेऊन वागत जा. संकटसमयीं मनोभा-

वानें देवाचा धांवा कर म्हणजे तो तुझें रक्षण करील इतकें बोलतां बोलतां ते योगी तेथेंच गुप्त झाले. दुसरें दिवशीं बाईसाहेबांचा शोध करीत करीत त्यांचे वडील विश्वंभर महाराज आले अन् त्याच दिवशीं संध्याकाळीं बाईसाहेबाचें आमच्या महाराजाशीं लग्न लागलें.

**सरस्वती**—बरें बाई एवढ्या दुःखांच्या तडाक्यांतून वांचलीस त्याचें सार्थक झालें.

**भागीरथी**—अग इतकेंच का म्हणतां तिच्या सारखी आज सुखी कोणी तरी दुसरी आहे का! सगळ्या पृथ्वीचा राजा तो नवरा मग ही पृथ्वीची मालकीण नाहीं का झाली, ही त्याची पट्टराणी नाहीं का होत.

**मीनाक्षी**—छे वेडे मी कसची, पट्टराणी ती दुसरीच आहे बर का.

**राधा**—अग आणखीं किती जरी असल्या तरी तुझ्यापुढें त्यांची कोणाची मात्रा चालायची नाहीं असंच तुझें रूप आणि चातूर्य आहे. हे आह्मांला उघड दिसतें आहे. बरें, तें असो सगळें, पण ( मीनाक्षीच्या गालास बोट लावून ) हें काय आहे ग? तूं राजाची पट्टराणी नाहींस तर मग?

**मीनाक्षी**—( सस्मितपणानें ) तूं तरी बरीच आहेसग. पण तूं म्हणत्येस तसें नव्हे हो कांहीं.

**राधा**—( हंसत हंसत ) तर मग सांगसनाग काय तें.

**स० व भा०**—आतां सांगतेस, सांगयला नाहींच कांहीं

तुला: कबूलच केलें पाहिजे. राधा तरी बरीच खजाळी आहे. कशी पण, अगदीं खुटवून टाकलन.

**मीनाक्षी**—अग तगदम्यानें साप म्हणून सावलीच नका धोपटूं. तो कनी— **आर्या.**

कस्तुरिचागे भाळी केला सखये स्वयेंच मी टिकला ॥
रदवण नोहे राधे अजुन कपोलींच थेंब तो टिकला ॥ ४१ ॥

**सख्या**—( हंसत हंसत ) शाबासग तुझ्या चतुरपणाची, जितकी वाखाणणी करावी तितकी थोडीच. बर आतां दिवस अगदीं धारेवर गेला आतां काळेंवांगे हिरवा देट उद्यां तिसरें प्रहरीं तुमची आमची भेट. ( सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ६ वा.



### स्थळ—गणपतीचें मंदीर.

( नित्य क्रमाप्रमाणें, गांवांतील शास्त्री, वैदिक व सूज्ञ संभावीत गृहस्थ आदिकरून समुदाय मोठा भव्य जमून सभामंडपांत मुंगीस देखील रीग मिळेना. अशी दाटी झाली होती. पुराण आटोपण्याचे संधीस धर्माधिकारी उभे राहून)—

**धर्माधिकारी**—विश्वंभर बाबा, उदईक गजानन क्षोभशांतीचा आपल्या येथें होम, हवन, व संतर्पणाचा समारंभ असल्या कारणानें गांवांत निमंत्रण देण्याकरतां आपल्या वडील

चिरंजिवांबरोबर मी गेलों होतों, पण आपण आपली कन्या मीनाक्षी आपण क्षत्रियास दिली. ही गोष्ट जातिधर्माविरुद्ध घडली. हा दोषारोप आपणांवर आहे. त्याचा निर्णय होऊन आपण दोषमुक्त झाल्याशिवाय आपल्या घरीं अन्नपानादि व्यवहार करण्यास ज्ञात राजी नाहीं. ह्या गोष्टीचा विचार प्रथम व्हावा. हें जें मी बोललों हे ज्ञातीचे आज्ञेनें बोललों आहे. मला क्षमा करावी.

विश्वंभर— श्लोक.

ऐकोनीं वृत्त हें हो, खचितच गमतो खेद चित्तास भारी ॥
नाहीं ठावें मला हें अनघच जन मी, जाणतो सिंदुरारी ॥
फेडाया भ्रांति सारी गजमुख नमना कंन्यका आणवावी ॥
पृछा तीतें करूनी सकलच मनिची भ्रांति फेडून घ्यावी॥४२॥

( विश्वंभर दिक्षितांनीं कानावर हात ठेवलें. असें पहातांच ज्ञातीनें एकवटून ठरविलें कीं, आतांच मुलीस आणवावें तिलाच विचारावें. ही ज्ञातीची आज्ञा शिरसामान्य करून विश्वंभरानें तात्काळ मुलीसह आपल्या घरच्या सर्व माणसांसह मंदिरांत आणविलें. मीनाक्षीनें येतांच देवास, मातापितरांस व सकल ब्रह्मवृंदास नमस्कार केल्यावर मीनाक्षिस लक्षून.

विश्वंभर— श्लोक

तुला मागूं आले मुनिवर महाख्यात जगतीं ॥
तयां तू तें द्याया सकलहि अह्मी सिद्ध सुमती ॥
असों आतां देवा नमन करिं भावें स्तवि तया ॥

म्हणे बा, दे, देवा, सुचिर, वर मातें, करि दया ॥४३॥

( असें वडिलांचें भाषण ऐकतांच तिला वाईट वाटलें. पण प्रत्युत्तर दिलें तर उद्धटपणाचा दोष लागेल तो न लागावा, व वडिलांची अमर्यादा न व्हावी म्हणून आलेला राग मिळून साश्चर्य आईस लक्षून. )

**मीनाक्षी**— **आर्या.**

प्रथमच नमनी तूझ्या आशीसंदिग्ध ऐकुनी झाला ॥
खेद बहू जीवातें तोच आतां उद्भवा इथें आला ॥ ४४ ॥
वूढेचे लग्न पुन्हा निंद्य जगीं जाणतात हें तात ॥
दान करूनीं कांगे पुनरपि दानास सिद्ध होतात ॥ ४५ ॥

याप्रमाणें मीनाक्षीचें भाषण ऐकतांच विश्वंभराचे तोंड खरकन उतरलें. सर्व सभासदांनीं आश्चर्यानें तोंडांत बोट घातलें. आणि हा प्रसंग फारच चमत्कारिक आला आहे. ह्या ब्राह्मणाच्या सत्यशीलत्वाविषयीं ह्या गांवांतीलचसे काय पण ह्या क्षेत्राच्या आसमंतांतील अबालवृद्ध कीर्ती गातील.तशीच ही मुलगी बाळपणापासून सुशील सुनीतिज्ञ तशीच तापसी, दृढनिश्चयी हिची ही बुद्धि कुमार्गास कधींही प्रवृत्त व्हावयाची नाहीं हेही आह्मांस खास वाटतें. पण प्रस्तूत हें आह्मास कोडेंच पडलें आहे व ह्याचा पोक्तपणें विचार करून ह्या व्यूहांतून बाहेर निघण्याचा मार्ग काढण्यास दिक्षीतच उपाय योजतील.

**विश्वंभर**—आपण सर्वांनीं हें मजवर ओझें लादलेंत हें सहाण्यास माझे अंगीं सामर्थ्य नाहीं. तत्रापि ज्ञातसमाजाची

आज्ञा शिरसामान्य करून श्रीगजाननानें, आह्मावर आलेल्या आरोपांत तथ्यांश असेल तो निदर्शनास येण्याचा यत्न करून पहाण्यास, स्फूर्ती, द्यावी. मी यत्न करून पहातों असें बोलून " मीनाक्षीस लक्षून " मीनाक्षी तुझ्या जन्मापासून तुझ्यासंबंधानें मला फार खस्ता खावी लागली, पण तुझें गुण व बुद्धी आणि मर्यादशीलपणा हीं पाहून केलेल्या कष्टांचा शीण वाटला नाहीं. तुजवर आलेलीं गंडांतरें सर्व श्रीगजानन कृपेनें सर्व टळून तूं आतां अल्लडस्थितीस येऊन पोंचली आहेस. तुला तुझ्या वयाप्रमाणें व्यवहारिकज्ञान चांगलें आलें आहे. कोणत्या आचरणानें लौकीक होतो, कोणत्या आचरणानें अपकीर्ती होते, हेंही कळूं लागलें आहे. धर्म म्हणजे काय, कुल म्हणजे काय, वडिलांचा लौकिक म्हणजे काय, इत्यादि गोष्टीही तुला चांगल्या समजूं लागल्या आहेत. माझा स्वभाव व माझें आचरण कशा प्रकारचें आहे व तुझ्या निमित्तानें माझा संकल्प काय झालेला आहे हेंही तुला ठाऊक आहे. इतक्या गोष्टी तुला उमज पडून तुझें ह्या राजाबरोबर लग्न मी लावून दिलें म्हणून म्हणतेस, पण मी कुरुपतीस तुला दिली नाहीं. तेव्हां तुझ्या लग्नाचा खरा प्रकार कसकसा झाला तो सर्व ह्या ब्रह्मवृंदास निवेदन कर. खरा प्रकार तूं न सांगशील तर कुरुपतीचें ऐश्वर्यरूप पाहून तूं त्याला वश होऊन गांधर्वविवाह लावण्यास तूं त्याला अनुकूळ झालीस, हा दोष तुजपासून घडल्यामुळें तूं माझ्या शापास पात्र झालीस असें माझ्या मनांत ठसलें आहे.

ह्या गोष्टीचा विचार करून काय असेल ती हकीकत सभासदां-पुढें विदीत कर.

**मीना०**—( कांपत कांपत ) बाबा मी आणखीं दुसरें काय बोलू.

**श्लोक.**

धरून मजचि नेलें जेधवां वारुणेस ॥
पुसत श्रमत आलां तुह्मिही त्या स्थलास ॥
विनवुनि तुह्मि ताता पूजुनी पान्डवारी ॥
नृप करिच विधीनें घातलें दान वारी ॥ ४६ ॥

याप्रमाणें मीनाक्षीचें भाषण ऐकतांच दिक्षित क्रोधानें संतप्त होऊन—

**विश्वं०**—दुष्टे, पापरूपे, कुलकलंके मी वारुणावतीस आलों होतों त्यावेळीं तुझ्या संबंधानें त्या राजसभेंत राजाशीं जें माझें भाषण झालें त्याची साक्ष राजानें जयद्रथाबरोबर तुला येथें पोंचतें केले व ब्राह्मणाची मानहानी त्यानें केल्यामुळें श्रीगजाननाचा त्या राजावर क्षोभ झाला, त्याचे शमनार्थ शांती करण्याकरितां सर्व तयारी करून होमहवन द्रव्यें देऊन त्या सार्वभौमास नाकदुराया काढणें भाग झालें आहे. हा प्रकार मी वारुणावतीस आल्यानें घडला हें प्रत्यक्ष दिसत आहे, पण मी तुझें दान केलें म्हणतेस तर आणखी एकवार तुला सांगतों कीं तुला सौख्यागारास ज्यानें पोंचविलें त्याचें स्मरण करून तुझ्या सत्यत्वाची ह्या सभासदांस प्रतीती दाखीव. नाहीं तर ह्या सभासदांच्या समक्ष तुला शापून भस्म करतों.

**मीनाक्षी**—( बापाचे हे निर्वाणचे शब्द ऐकून तटस्थ झाली. )

**कटाव.**

ताताची तैं निष्ठुर वाणी ॥ स्पष्टपणें जैं पडतां कानीं ॥ कष्टप्रद भासे निर्वाणी ॥ इष्ट सुखावर पडलें पाणी ॥ घडली कशिही विपरित करणी ॥ दुःखाब्धीला होउनि तरणी ॥ ठावच मज कां देइन धरणी ॥ शंकर चरणीं अक्ष लाविले ॥ चित्त प्रेरिलें ॥ प्रभो दयाळा रक्षण केलें ॥ पतिव्रतेचें व्रत तूं बापा ॥ आतां जन बोलाच्या पापा ॥ लाउनि देउ पाहति तापा ॥ पंकीं रुतल्या गाईस बापा ॥ काढुनि दावीं मार्गचि सोपा ॥ सत्कीर्तीच्या कईळि रोपा ॥ दुर्वार्तेचे करकीं झापा ॥ घालुनि देती व्यर्थच तापा ॥ तुजविण कोणी नसे रक्षितां ॥ नगजामाता ॥ मृडानि कांता ॥ अनाथ नाथा ॥ व्यापक तूं सर्वत्न असोनी ॥ कसे न जाणशि संकट अजुनी ॥ सदां बैसशी समाधि लावुनि ॥ देवा ! पावें बहूत शिणलें ॥ युगसम भासति मजला विपळें ॥ तुज कां नकळे ॥ प्रेमे पाहुनि श्रीयाळाला ॥ उद्धरिलें बा महानंदेला ॥ जसे येउनि ऋषि पुत्राला ॥ तैसे रक्षीं सत्वर मजला ॥ दीन दयाळा परम कृपाळा ॥ नंदीवरि बैसुनि ॥ सत्वर येउनि ॥ वितन्डवादी मनीं मुरवुनी ॥ आळ पुरवीं दीनोद्धरणा ॥ गिरिजा रमणा तूं तारक पाहिमां ॥ १ ॥ बाल्यावस्थे माजी मजला ॥ ऋषिपुत्रें जो शाप दीधला ॥ ठावाऽसे तो मत्पितरांला ॥ वाटे तत्संबंधाचे घडला ॥ हरीपुरावर पडला घाला ॥ धडधड धडधड तोफा सुटती ॥ दणणण दणणण अ-

वाज होती ॥ खणणण खणणण शस्त्रें वाजती ॥ सूंसूंसणणण बाण सूटती ॥ हय खंकळती ॥ धडका देउनि करी पाडती ॥ वीर खालती ॥ कर चरणांशीं सर्व खंडिती ॥ हर हर हर हर शब्द बोलती ॥ परस्परांचे उसनें घेती ॥ दाहि दिशांना धूर दाटला ॥ धीर तूटला ॥ कंप सूटला ॥ माय मिळेना ॥ तात दिसेना ॥ प्रसंग भारी ॥ गुंगुच सारीं ॥ कितिक दडाले गिरि गव्हेरी ॥ शक्ति न बुद्धि ठाव शरीरी ॥ पडले होते शून्य मंदिरी ॥ दुष्ट दांडगा ॥ आला भांडगा ॥ गमे लांडगा ॥ धष्ट पुष्ट तो ॥ दुष्ट करांनीं ॥ बळेंच उचलूनि ॥ रथीं बांधुनी सवेच पाठीं ॥ बसून थोपटी ॥ हयरथ पीटी ॥ घांटे मनि त्या हेतू साठीं ॥ आधि मला तो पाडि संकटीं ॥ वदे माळ तूं मजला घाली ॥ ताळ सोडुनी मन्मथ जाळी ॥ गुंगे काळ तो कोणि न वाली ॥ परोपरी म्या विनती केली ॥ तरी सर्वहि व्यर्थच गेली॥ निर्दय दुष्टा दया न येतां ॥ विपरित चेष्टा ॥ करितां स्मरतां तुजला श्रेष्ठा ॥ पाहिले न अंता ॥ गिरिजा कांता ॥ सर्वचि असतां तुजला ठावें ॥ किती बहावें ॥ शरणशरण्या ॥ गिरिजारमणा ॥ २ ॥ ऐसे संकट बा त्वां हरिलें ॥ वारुणेसजे मजला नेलें ॥ कुरुपतिच्या त्या शिबिरीं पडलें ॥ अविहित कर्मा तयें वाहिलें ॥ तुवांच तेथें मला राखिलें ॥ पंचशरानें छळितां मजला ॥ जोगी रूपें सवेच आलां ॥ उपदेशुनि पंचाक्षरि मंत्राला काम ताप त्वां असा वारिला ॥ मायबाप तूं होउनि येशी ॥ हाय बोलशी ॥ नृपास भेटुन पाय धरीशी ॥ दीन होउनि अ-

श्रु ढाळिशी ॥ कन्येची ह्या जोड बोलशी ॥ नृपें प्रदर्शित हेतू केला ॥ सर्वेंच तुज तो बहु मानवला ॥ यथाविधी त्वां भूप पूजिला ॥ नृपा करी त्वां अर्पुन मजला ॥ तोष पावला ॥ ऐशा कृतिनें सुखागराला ॥ पोंचविलें त्वां ह्या कन्येला ॥ परि मनि धरि तो तात भ्रांतिला ॥ भी तें बहु मी अपवादाला ॥ फेडीं आतां जन भ्रांतीला ॥ तुजविण कवणा प्रार्थु दुजाला ॥ धांव धांव धांव आतां दिनोद्धरणा ॥ गिरिजा रमणा० ॥ ३ ॥ ऐसा बोलचि ऐकुन सतिचा ॥ प्रियभक्तीचा नीलकंठ तो परिसुनि साचा ॥ हेलावे निधि दया रसाचा ॥ तुष्ट होउनी वाणी खाशी ॥ संकट नाशी ॥ झालि अकाशीं ॥ " सति मीनाक्षी ॥ असेच पाहीं ॥ घडला प्रकार उक्त सर्वही ॥ विकल्प सोडुनि द्या लवलाही " ॥ अशरीर वाणी ॥ अशी पडतां कर्णीं ॥ ब्रह्मवृंद तैं जोडुन पाणी ॥ म्हणती त्रिनयन अघटित करणी ॥ नानापरिच्या वस्त्राभरणी ॥ सति गौरविली ॥ भक्त विपत्ती हरिली ॥ गिरिजारमणा तूं तारक पाहिमां ॥ ४७ ॥

अशा प्रकारें मीनाक्षी धांवा करीत असतां एकाएकीं मोठा कडकडाट होऊन वीज चमकली. त्या तेजानें सर्व सभासदांचे डोळे दिपून जाऊन काय प्रसंग गुदरतो कोण जाणे अशी सर्वांस भीती वाटून जो तो जागचे जागीं धामाधुम होऊन गेल्यामुळें जिकडे तिकडे अगदीं सामसूम होतांच—)

## श्लोक.

" अस्माभिश्चेयमुद्वाहे कन्या दत्ता द्विजोत्तमाः ॥

अतो न दूष्यं दांपत्यं नापि कन्या सुनिर्मला " ॥४८॥

( अशी आकाशवाणी झालेली सर्वांनीं स्पष्टपणें ऐकतांच आपण ह्या सतीचा अजाणपणानें छल केला आतां तिची क्षमाच मागितली पाहिजे असें सर्वांस वाटूं लागलें तेंव्हां सर्वानुमतें धर्माधिकारी उभे राहून मीनाक्षीस लक्षून तिची प्रार्थना करणार तों इतक्यांत—)

**विश्वं०**—अहो धर्माधिकारी बाबा, थांबा थांबा थोडा वेळ. घाई करूं नका. कोण आहेरे जनार्दना ? आजच्या ह्या प्रसंगीं जयद्रथराजा ह्या मंदिरांत आला होता कारे. बहुधा नसेलच. त्याला ह्या प्रसंगास पाचारणच झालें नसेल ! आमच्या भटाभिक्षुकाच्या घरीं इतका साक्षेप कोठून असणार ! ! !

**धर्माधिकारी**—महाराज आपण आतां बोललां तसा प्रकार दुसऱ्या एखाद्याचे घरीं कदाचित् होण्याचा संभव खरा. आपल्या इथें तसें कधीं झालें नाहीं. ह्या अपूर्व गोष्टीनिमित्त ह्या क्षेत्रांतील तमाम ज्ञातिवृंद ह्या मंदिराभोंवतीं मौज पहाण्यास यावे ह्या बुद्धीनें सर्वांस निमंत्रण करविलें, आणि त्या राजास सूचना करण्यास मी स्वतां गेलों होतों व ते महाराजही आले होते.

**विश्वं०**—बरें तर त्यांस मजपर्यंत पुन्हा घेऊन या.

**धर्मा०**—आज्ञा महाराज. ( जाऊन राजासहवर्तमान येऊन ) जयद्रथराजा प्रणाम करीत आहे.

**विश्वं०**—तुम्हास तो जगदीश सुखी ठेवो. राजा, तूं आ-

त्यापासून येथें जें नवलविशेष तुझ्या पहाण्यांत येत असेल तें तूं आपल्या राजास कळवीत असशीलच.

**जय०**—हो, रोजची वर्दी सार्वभौम सेवेस जात आहे. आणि जेणेंकरून आपणास संतोष होऊन आह्मावरचा राग नाहींसा होऊन अनुग्रह होईल असे प्रकार करण्यांत सदोदीत तत्पर रहाण्याविषयीं आज्ञापत्रें नित्यशः येत आहेत.

**विश्वं०**—जशी तुमची निष्ठा असेल तसें तुम्हास फल देणार प्रभु समर्थ आहे. आज तुला इतकेंच सुचवितों कीं, ज्या अर्थी गजाननक्षोभशांत्यर्थ होमहवनादि क्रिया माझ्या हातून व्हावी असें तुह्मी इच्छितां त्या अर्थी पूर्णाहुतीचे वेळीं यजमान ( राजा ) येथें हजर असला पाहिजे, असा शास्त्रोक्त व रूढीमार्ग असल्याचें मी आपलेकडून तुम्हास कळवीत आहें. ही सूचना मान्य किंवा अमान्य करणें हें तुह्माकडे आहे.

**जय०**—महाराजांची आज्ञा कौरवेश्वरास विदित करून गुरुवर्यांच्या चरणाचे दर्शनास येण्याची सूचना करितों.

**विश्वं०**—आतां सूर्यास्ताची वेळ झाली, मी स्नानास जातों. तूंही आपल्या डेऱ्यास जा.

( निघून जातात. )

---

## प्रवेश ७ वा.



### मोतीबाग—जयद्रथ राजाचा डेरा.

( श्रीगजानन मंदिरांतून परत येतांक्षणींच. )

**जय०**—पांचालका, शिवनंदन कारभाऱ्यास मीं तुमचें स्मरण केलें आहे म्हणून कळवून ताईसाहेबांकडे जा आणि मीं सांगितल्याप्रमाणें कळवून ये.

**शिवनंदन**—महाराज वंदन करतों.

**जय०**—या, आजकाल तुम्ही येथल्या श्रीगजाननमंदिरांत गेला होता का ?

**शिव०**—जीं, सरकार, रोज जातों. तेथें त्या गुरुमहाराजास पाहिलें म्हणजे काळीज थरारून जातें.

**जय०**—कां बरें ?

**शिव०**—पुराणांत किंवा कीर्तनांत विश्वामित्र ऋषीच्या सामर्थ्याच्या गोष्टी ऐकिल्या म्हणजे त्या ऋषीविषयीं मनांत पूज्यभाव उत्पन्न होऊन मन वचक खाऊन जसें गांगरतें, तसें या गुरुमहात्म्यास पाहिल्यासरसें होतें. रोज आपल्या वेड्यांत त्या अग्निहोत्री बावाच्या आवशाच्या गोष्टी अष्टौप्रहर. दुसरा छंदच नाहीं.

**पांचा०**—सेवकास माफी असावी. ताईसाहेबांकडून दा-

सी पत्र घेऊन आलेली बाहेर उभी आहे. ( थैली पुढें ठेवून उभा रहातो. )

**जय०**—( पत्र वाचून पाहून त्याचबरोबर सार्वभौमाचे नांवचें निराळें खुलें पत्न होतें तें वाचून पहातांच आनंदानें राजास साकल्यवृत्त गेल्या दोन दिवसाचें कळवून जें कांहीं करावयाचें तें बहुतेक काम ताईसाहेबांनीं महाराजास चारच ओळी लिहिल्या आहेत तेवढ्यानें खास होण्याजोगें आहे इतकें मर्मज्ञतेनें त्या लिहिलेल्या आहेत व त्याच पुढें पाठविण्याविषयीं ताईसाहेबाची आज्ञा आहे तसें केलें म्हणजे झालें. ) आतां राजास केवळ सूचनार्थ पत्न लिहिलें म्हणजे झालें.

### पत्र.

स्वस्ती श्री महा शुभस्थान हस्तनापूरवासी सार्वभौमचरण कमल मकरंदमिलिंद जयद्रथ याचे स्वामीचे चरणीं सांष्टाग प्रणामपूर्वक विज्ञप्ती ताईसाहेबांनीं सरकारचे सेवेशीं सादर करण्याकरितां दिलेलें पत्न.

### श्लोक.

नसोनीच हो दोष तोले शकीं हा ॥
वृथा त्यागिलें दासितें हो अहाहा ॥
भवें हारिले सर्वही क्लेश आतां ॥
कधीं पाय पाहीन ते हीच चिंता ॥

अवलोकनांत येऊन जी तजवीज होणें ती मर्जीनुरूप व्हावी हे विज्ञप्ती.

**जय॰**—पांचालका, सकलहोमद्रव्यें पश्वादिकांसह विश्वंभर महाराजाच्या यज्ञशाळेकडे लौकर पाठीव मी तिकडेच जातों.

( विश्वंभरबावा यज्ञशाळेंत पात्रांची वगैरे व्यवस्था पहात आहेत तों त्या शाळेचे दाराजवळ धर्माधिकारी येऊन )

**धर्मा॰**—महाराज, आपल्या निमंत्रणपत्रिकेप्रमाणें गर्गमुनेश्वर वरुणावतीहून निघाल्याचे पत्र आले आहे. ते आज सायंकाळीं येथें येतील. त्यांची उतरण्याची तजवीज कोठें करावयाची ती आज्ञा व्हावी.

**विश्वंभ॰**—त्यांना आपल्या आश्रमातच उतरावयास आणावयाचें आहे. ते येतांच मला कळवा.

**धर्मा॰**—हें शिष्यमंडळ येतांना दिसत आहे हें त्यांचेंच वाटतें. ( थोडें पुढें जाऊत परत येऊन ) होय तेंच खास. ही त्यांची पालखी आपल्याच वाड्याकडे वळली. महाराज, आचार्य आले हो आले.

**विश्वं॰**—( सामोरे जाऊन आचार्य पालखींतून उतरतांच नमोनमः परस्पर भेटल्यावर उभयतां प्रथम यज्ञशाळेकडे जाऊन येऊं चला कारण अवधी काय ती आजचीच रात्र, म्हणून अगोदर तिकडे गेलेंच पाहिजे. चलावें आपण.

( निघून जातात. )

---

## प्रवेश ८ वा.

स्थळ—यज्ञशाळा.

गर्गमुनी—( यज्ञशाळेंतील सर्व व्यवस्था पाहून कांहीं द्रव्यांस हात लावून ) ही देखील राजानेंच पाठविली ना ?

विश्वं०—होय, यच्चयावत् द्रव्यें राजाकडूनच आलेलीं, व विपुलही आहेत. बरी आठवण झाली; रे जनार्दना, रे रामचंद्रा, आहे कायरे कोणी येथें.

राम०—हो, मी, जनार्दन शास्त्री, गोपाळ शास्त्री वगैरे अद्याप येथेंच आहों. पण अरणी आणावयाकरितां वाड्यांत जायचें आहे.

विश्वं०—बरें, जा, आणि जातांना धर्माधिकाऱ्यांस इकडे पाठीव. लौकर या म्हणून सांग जा.

धर्मा०—( यज्ञशाळेचे द्वारापाशीं बाहेर उभें राहून ) आपण माझें स्मरण केलें आहे म्हणून रामशास्त्र्यांनीं मला सांगितलें.

विश्वं०—हो, मींच त्यास सांगितलें. अंगदेशाचा राजा आला आहे त्यास रमणबागेंत उतरण्यास जागा दाखवा, आणि तो उतरल्यावर ( धर्माधिकाऱ्यांचे कानीं ) याप्रमाणें त्यास माझा निरोप कळवा. अक्षरशः मीं सांगितल्याप्रमाणेंच बरें. आणि

काय म्हणतील तें परत माझ्या कानावर लागलींच आलें पाहिजे. मी आतां नित्य कृत्यास लागतों. (धर्माधिकारी परत येऊन)

**धर्मा०**—विश्वंभरवात्रा आपल्या आज्ञेप्रमाणें कुंडमंडपादि सर्व तयारी करवून सकल हवनद्रव्यें मंडपांत आणवून ठेविलीं आहेत तीं आपण अवलोकन करा, आणि कोणती वस्तू कोणत्या ठिकाणी ठेवण्याची ते सांगा म्हणजे त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास लागूं. राजानें पाठविलेले पशू अगदीं असावे तसेच उत्तम आहेत ते मंडपाच्या उत्तरेकडच्या आंगास उभे करवले आहेत. उदयीक पूर्णाहुतीच्या वेळी राजा, शास्त्री, पुराणीक, वैदिकादि शिष्टांस व दरबारी वगैरे सर्वांस अग्निनारायणाचे दर्शनास येण्याचे निमंत्रण केलें आहे.

(कुंडासमोरच्या विस्तीर्ण, भव्य, अशा सुशोभित केलेल्या मंडपांत प्रेक्षक समाज मर्यादितपणें आपापले योग्यतेनुरूप योग्य स्थानीं बसले आहे तों.)

**कर्ण**—मंडपांत प्रवेश करतांच सर्व प्रेक्षकसमाजाने शिष्टसांप्रदायाप्रमाणें त्यास ताजीम दिली, (धर्माधिकाऱ्यानें) तेथील व्यवस्थापकानें, त्याचे योग्यतेनुरून बसण्याची जागा कर्णास दाखविली, तेथें बसावयास जातांना ऋत्विजस्थानाकडे त्यानें नजर फिरविली तों गर्गमुनी दृष्टीस पडले. त्यास पहातांच (गुरुचरणाप्रत दंडवत असो) असें बोलून स्वस्थानीं जाऊन बसला. नंतर थोड्याच वेळानें राजाची स्वारी आली. तोही आपल्या योग्यस्थानी विराजमान झाला ते स्थान व कर्णाचे

स्थानाजवळच. पण त्यानें राजास चालीप्रमाणें ताजीम दिली, पण एकमेकांशीं भाषण झालें नाहीं. त्या उभयतांच्या मुद्रा मात्र प्रफुल्लित होत्या.

**विश्वं०**—वाहवा ! राजानें द्रव्यें तर उत्तम पाठविली आहेत. अरे, कोण आहेरे, जनार्दना, रामा, विष्णू, या, एकेक वस्तू माझ्या हाती द्या. ( कुंडाच्या समीप भागीं आचार्यांस बसवून त्यांचे डाव्या अंगास आपण बसून. )

श्लोक.

घेउनीच एक एक वस्तु विप्रहस्तकें ॥
मांडि तोचि सव्यभागि अग्निच्या ति कौतुकें ॥
घेउनीच शुद्ध नीरहस्त धूत सेवरी ॥
पात्र हस्ति सव्य स्यांत आवदान तें भरी ॥ ९० ॥

( याप्रमाणें सर्व द्रव्यांचें यथाविधी हवन झाल्यावर हात जोडून—)

श्लोक.

नमूनि दीन प्रार्थितों करद्वयास जोडितों ॥
करीं अतां दया प्रभो त्वरित पंकि कष्टतों ॥
गणेशपूर नायका हरीपुरास तारका ॥
बिरीद राखि बा अतां त्वरित सिंदुरांतका ॥ ९१ ॥

( या प्रमाणें चतुर्वर्णी प्रचंड समाज जमला होता त्याचे समक्ष पूर्णाहुती देऊन पुन्हा. )

श्लोक.

असे माझ्या स्तोत्रें वळुनि तुम्हि पाशास त्यजिलें ॥
हराया भूपाचें वल सकल चित्तींच धरिलें ॥
तरीं आतां देवा अशित धनुला त्या तुम्हि करा ॥
करा आतां देवा त्वरितच दया त्या नृपवरा ॥ ९२ ॥

अशी त्या दिक्षितांनीं प्रार्थना करतांच होमकुंडांतून मोठमोठ्या इंद्रधनुष्यवत रंगाच्या ज्वाळा आकाश अवलंबू लागल्या, त्या ज्वाळांतून अग्निनारायण प्रघट झाला त्या तेजानें प्रेक्षकसमुहा पैकीं कित्येकांचे डोळे दिपून गेले आहेत, कित्येक घाबरून दूर सरताहेत, अशा संधींत प्रेक्षकां समक्ष—

श्लोक.

हुताशाने येउनि त्या द्विजातें ॥
अर्पीयला पायस तो स्वहातें ॥
म्हणेच तो दे निज कंन्यकेतें ॥
सुता तुझी पाउ सुता प्रती ते ॥ ९३ ॥

( इतकें बोलून अग्निनारायण अंतरधान पावले. )

**विश्व**—जनार्दना, अग्निनारायाणाचा प्रसाद घेण्यास मीनाक्षीस व त्या राजास बोलाव पुढें. ( पायस पात्र हातांत घेऊन त्यांची मार्गप्रतिक्षा करतो. )

**जना**—(ताई, अग्निनारायणास नमस्कार कर. राजा, आपणही नमस्कार करावा.) हीं उभयतां आलीं आणि त्यांजकडून नमस्कार करविला.

**विश्वं०**—( पायस पात्र राजाचे हातांत देऊन ) हें ग्रहण कर व ह्यांतलेंच थोडेंसें ( मीनाक्षीकडे बोट करून ) तिला दे. ( तसें करून नमस्कार करतात. ) मीनाक्षीस लक्षून—

**आर्या.**

पोटीं येउन माझ्या गाजविलें नांव त्वांच सुकुलाचें ॥
कुरुसंगे नांद सुखें लक्षुनिगे बीज सत्य धर्माचें ॥ ९४ ॥

**धर्मा०**—( ज्ञाति समुदायाच्या तर्फे मीनाक्षीस लक्षून बोलणार इतक्यांत—)

**विश्वं०**—अहो थांबा, अहो धर्माधिकारी क्षणभर धीर धरा. आचार्य ह्या प्रसंगीं आले आहेत त्यांचे चार शब्द कानीं पडावे. असो, समाजाचा मानस दिसतो. तुम्ही अंमळ अवकाश करा.

**गर्ग०**—सज्जनहो, आज, जी समारंभाची मौज पहाण्याकरितां आपण ह्या क्षेत्रीं मिळालों आहों याचे मूळ पीठिकेची इतरांपेक्षां मला थोडी अधिक माहिती असून याचे उत्सवासही निमित्तमात्र मी कारण झालेला आहें. तेव्हां वस्तुस्थिति खरोखर काय असेल ती आपणास विदित व्हावी. हा एक हेतु विश्वंभर बावांनीं मला येथें ह्या प्रसंगीं निमंत्रणपत्रिका पाठवून, बोलावण्यांत असावा असें मला वाटतें. ह्या संबंधीची मला जितकी माहिती आहे तितकी सर्व सांगण्याचें म्हटलें म्हणजे त्या कामास वेळ जितका पाहिजे तितका खरचण्याची आपणास सवड नाहीं हें मला उघड दिसत आहे. म्हणून मी चार शब्द

आतां बोलणार आहें, हे त्या संबंधाचे समजून बोलणार, पण बाह्य दृष्टीनें ते आपणास बादरायण संबंधवत् भासतील. पण तसें न समजतां सर्वांनीं इकडे लक्ष द्यावें, व माझ्या भाषणाचा आपण विचार करून पाहून वाटेल तसें करावें ही माझी सूचना आहे.

मित्रहो, देव आणि मनुष्य, म्हणजे अमर, आणि मरणाधीन ह्या दोन्ही, वस्तुस्थितीच्या दृष्टीनें पाहूं गेलें म्हणजे ब्रह्मांडांत अगदीं विरोधरूपानें वास करीत आहेत हें अगदीं आडाणी मनुष्यास देखील कळत आहे. तरी ह्या दोघांमध्यें सेव्य, आणि सेवक हा संबंध आपल्या कर्मगतीनें अव्याहत जडलेला आहे. त्यांच्या म्हणजे ज्यांना आपण देवाप्रमाणें म्हणजे देवच मानतों त्याच्या सामर्थ्याची आणि आमच्या सामर्थ्याची कोणी तुलना करून पाहूं लागला तर एका खंडीशीं पाव रतीचें वजन; म्हणजे जमीन अस्मानाचे अंतराइतकें महत् अंतर स्पष्ट दिसून येणार आहे. त्यांनीं आह्मास आपल्याप्रमाणें बनविण्याचें मनांत आणिलें आणि अमृताचा एक बिंदु आमचेकडे फेंकला तर त्याचक्षणीं आपण देव बनणार आहों. आणि आपण कितीही प्रयास केले तरी त्याच्या स्थितींत आमच्यानें वालाग्रदेखील फरक पाडतां येणार नाहीं. ते सर्व प्रकारें आज सामर्थ्यवान आहेत आणि आपण अगदीं त्यांच्या उलट स्थितीमध्यें आहों. असें असतां, लक्ष्यांत धरून विचार करण्याची गोष्ट ही कीं, त्यांची आणि आमची सुखप्राप्तीविष-

यींची इच्छा सारखीच ! ! ! केवढा चमत्कार हा ! ! ! आतां माझ्या मतें विचारणीय गोष्ट " सुख " ही होय आणि ती सर्वांच्या मनांत बिंबण्याकरितां सुख शब्दाची थोडी व्याख्या ह्या प्रसंगीं करणें अवश्य आहे असें मला वाटतें, म्हणून माझ्या समजुतीप्रमाणें मी व्याख्या करतों.

सुख—हा द्व्यवर्णात्मक शब्द अगदीं लहान दिसतो, तरी ह्यानें तीन प्रकारांनीं सर्व ब्रह्मांड व्यापिलें आहे असें दिसतें. तीं तीन रूपें, मानसिक, उपद्व्यापक, आणि उपाधिक, हीं होत. म्हणजे " अनित्यानि शरीराणि वैभवं नैव शाश्वतं " ह्या उक्तीस अनुलक्षून आयुष्यक्रमणांत सदा संतुष्ट राहतात त्यांस जें सुख वाटतें तें पहिलें. " दैवाधीनकुलींजन्ममदाधीनचपौरुष ", ह्या वाक्याप्रमाणें काल क्रमणारे मानतात तें दुसऱ्या प्रकारचें. " तस्मात्सर्वप्रयत्नेन ऋणं कृत्वा घृतंपिबेत् " ह्या वचनास अनुसरून सुखोपभोगाची इच्छा धरून वागतात आणि ते जें अनुभवतात तें तिसऱ्या प्रकारचें. ह्या शेवटच्या प्रकारच्या सुखप्राप्तीच्या आशेस " कारस्थान " आणि आशा कारणारांस कारस्थानी म्हणतात. व कारस्थानी पुरुष हे नेहमीं श्रेष्ठ वर्गांतले असतात. हे लोक आपलें इच्छित कार्य, मग तें अगदीं क्षुल्लक अगर महत् कसेंही असलें तरी ते सिद्धीस नेण्याचें असा निश्चय त्यांनीं केला, म्हणजे आपला हेतु तडीस नेण्याला शास्त्रें, रूढी, नीतिवचनें, ज्ञातधर्म, अगर असलेच गहन विचाराचें कांहींही आडवें आलें तरी त्यास न जुमानतां आपले

मनोगत तडीस नेतात. अशा प्रसंगीं परलोक अथवा पर द्वी-
पस्थ शतशः सधन, निर्धन, सवल दुर्बलांचा चकाचूर होऊन ते
रसातळीं गेले तरी त्या कारस्थानी स्वकार्य साधूंच्या मनास
द्रव येणें लांवच, पण थोडा खेद देखील वाटत नाहीं. पण अ-
शा कारस्थानी पुरुषांत जे कांहीं कोंवळ्या मनाचे असतात
त्यांच्या मनाला, ती, गरीव, अनाथ परधर्मी, परलोकी, परदेशी
लोकास झालेली निरपराधी गांजणूक, खात असते. ते मात्रच
संधी सांपडेल तेव्हां त्या निरपराधी दुःखितांची दाद घेतात.
अस्तु. इतका प्रकार आपणास सांगण्याचें कारण ह्या मीनाक्षी-
चें भावी स्वर्गारोहण होय. ( मीनाक्षीकडे बोट दाखवून )
हिचें ( राजाकडे हात करून ) ह्या राजाशीं लग्न लागल्यानं-
तर जो कांहीं अलौकीक व भयंकर प्रकार घडलेला आपण स-
र्वांनीं ऐकिला त्याचें मला महत् आश्चर्य वाटून मी ज्ञानदृष्टीनें
विचार पाहूं लागलों तेव्हां श्रीनारदमुनीनें मला दर्शन दिलें.
आणि म्हणाले " चित्रसेन गंधर्वाची कन्या ( मीनाक्षीस बोटानें
दाखवून ) ही धान्यमाली गुरुशापानें मृत्युलोकीं जन्मास आली
त्यामुळें स्वर्गीं इंद्रसभेंतल्या सभासदांच्या दृक्सुखांत उणीव
पडली ती दूर करण्याकरितां ( मीनाक्षीकडे बोट करून ) हि-
ला कांहीं कालानंतर स्वर्गीं नेण्याचा विचार इंद्रसभेंत ठरला
त्या योजनेचे पूर्वोपायानें तुम्हीं पाहिलेला चमत्कार व प्रळय
इहलोकीं घडला.

आणखी—चंद्रप्रभा म्हणून जी कुरुपतीनें तुमचे संरक्षणांत

ठेविली आहे तिचा पिता कुरुपती आहे व कर्ण हाच तिचा भ्रतार आहे अशी त्यांनीं मला एक निराळीच कथा सांगून कळविलें. आणि आजच्या प्रसंगांत राजाचे हातून चंद्रप्रभेचें कन्यादान करवा अशी त्या देवऋषींची मला सूचना असल्याचें मीं राजास कळविलें आहे.

दुर्यो०—ह्या प्रसंगींचसें काय, गुरुआज्ञा आह्मा क्षत्रियास पितृआज्ञेप्रमाणें सदा सर्वदा मान्यच आहे. पण लागाबांधा किती अलौकिक आहे ! ह्या चंद्रप्रभेला अंगराजाचे डेऱ्यावरून आणण्यास दूत पाठविले त्यावेळीं चंद्रप्रभेविषयींची माझी बुद्धि होती ती चंद्रप्रभेस पहाण्याबरोबर नाहींशी झाली. ही माझी कन्या मला भेटावयास आली असें वाटतांच माझ्या मनाची झालेली स्थिति मीं गुरूचरणीं विदित करून चंद्रप्रभेस गुरुजींचे स्वाधीन केली ती हा वेळ पावेतों त्याचेच आश्रयानें होती. प्रस्तूत तर नातेंच कळलें. म्हणून अंगराजास लक्षून—

अंगराजा ही माझी कन्या मी पितृधर्मानें आपल्या पदरीं बांधतों हिचा आपण अंगीकार करावा. आणि गत गोष्टी सर्व विसरून जाव्या. हें माझें आपणास सांगणें आहे.

( वस्त्रभूषणें देऊन चंद्रप्रभेस हातीं देतो. )

**कर्ण**—मला पूर्वींच्या कोणत्याच गोष्टीचें स्मरण नाहीं. मी आपणास मित्रभावानें लेखीतच होतों. आतां तर आपण श्वशुर झाला. ह्या नात्यानें सर्वकाळ आपण मला पूज्य झाला.

या नात्यानें दंडवत करून चंद्रप्रभेचा स्वीकार करतों. )

**धर्मा**०—( मीनाक्षीस लक्षून— )

### आर्या.

नेणुन, आह्मीं केला छल, हें ठेऊ नको मनीं सुभगे ॥
आशी आह्मा द्यावा सर्वांतें सत्य साजगीं शुभ गे ॥ ९५ ॥

**मीना**०—( सर्व ज्ञातिवृद्धास मोठ्या लीनतेनें ) पागोळीचें पांणी आढ्यास कसें बरें जाईल ?

### आर्या.

सर्वांच्याच कृपेनें ह्या स्थिति तें पावलेंच भूदेवा ॥
कंन्या ह्या पायांची आशी द्या मज तुम्हींच सुख ठेवा॥९६॥

( हें ऐकून सकल ब्रह्मवृंद विश्वंभर बावांचे तोंडाकडे पाहूं लागले. )

**विश्वं**०—( मीनाक्षीस लक्षून. )

### आर्या.

श्रीगजवदन कृपेनें सुत तुज होईल फार गुणवंता ॥
पितरांदि सर्व आप्तां लीलेनें तोषवील अत्यंता ॥ ९७ ॥

राजास लक्षून—

### श्लोक.

नांदें सुखें नांदविं कंन्यकेतें ॥
ध्यावें सदां बा गिरिजा पती तें ॥
दाता तुला तोच महापदाचा ॥
हंताच होतो भजतां यमाचा ॥ ९८ ॥

प्रेक्षक समुदायास लक्षून--

### आर्या.

ध्या, पंचानन, व्हा, पंचानन, छलक, संघ फोडाया ॥
निज धर्मा रक्षुनि, बा, लावा शत्रूंस हात जोडाया ॥ ९९ ॥

